





नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका





काय गा म्या पामराने

खरडावी बाराखडी

आणि बोलावी उत्तरे

टिनपाट वा चोमडी

कधी लागेल का नख

तुझे माझिया गळ्याला

आणि सामर्थ्याचा स्वर

माझिया गा व्यंजनाला

मराठी
अभ्यास
परिषद
पत्रिका

# भाषा आणि जीवन

वर्ष १४ : अंक २
उन्हाळा १९९६

अनुक्रम




**प्रकाशन :** त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)





**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तक :** कल्याण काळे, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे - ४११ ००७ (दूरध्वनी : ३५६०६१ / २१८७)

**व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंटस्, ४६/४ एरंडवणे, पुणे - ४११ ००४ (दूरध्वनी : ३३३८६९)


**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरण पृष्ठ तीन पहा.




या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन सहमत असेलच असे नाही.

**संपादक :** कल्याण काळे **प्रकाशक व मुद्रक :** मराठी अभ्यास परिषदेसाठी – मृणालिनी शहा
**मुद्रण स्थळ :** सहकार मुद्रणालय, ५४० गणेश पेठ पुणे - २.

संपादकीय

# वेड लागलेलं घर

डॉ. इरावती कर्वे यांचा वरील शीर्षकाचा एक निबंध आहे. लालित्याची डूब देऊन लिहिलेला तो एक सुंदर विचारप्रवर्तक निबंध आहे. या निबंधांत त्यांनी आपल्याला आलेल्या एका विलक्षण अनुभवाचं वर्णन केलेलं आहे.

त्यांना एकदा असं जाणवलं, की त्यांच्या घरातील भिंती, दारं, फर्निचर यांच्यांत काही तरी बदल झाला आहे. या वस्तू निर्जीव असूनही निर्जीवांसारख्या वागत नव्हत्या. त्या सगळ्या वस्तू प्रेमळ व्यक्तींप्रमाणे घरातल्या मुलांची काळजी घ्यायला लागल्या होत्या. थोरला मुलगा धावत येत असताना टेबलावर धडकणार, असं वाटतं आहे, तोच ते टेबल त्याच्या मार्गातून बाजूला झालं. मुलगी पळत येत होती, तिचं डोकं आता भिंतीवर आपटणार, असं वाटत असतानाच ती भिंतच थोडी कलल्यासारखी झाली आणि मुलगी सुखरूप राहिली.

सगळ्याच वस्तू अशी आपल्या मुलांबद्दल आस्था दाखवू लागल्या, हे पाहून इरावतीबाईंना आनंद वाटण्याऐवजी काळजीच वाटू लागली, आणि मोठ्या कळवळ्यानं त्या वस्तूंना हात जोडून त्या म्हणाल्या,

''बाबांनो, माझ्या मुलांची काळजी मला नेहमीच वाटते; पण आज तुमचं वागणं पाहून ती अधिकच वाटू लागली आहे. आज तुम्ही त्यांना सुरक्षित ठेवण्याचा प्रयत्न करताहात, त्यांच्या मार्गातून दूर होऊन त्यांना वाट करून देताहात, याबद्दल मी तुमची कृतज्ञ आहे. पण त्याचा परिणाम असा होईल, की त्यांना याची सवयच लागून जाईल. तुम्ही त्यांना वाट करून देताहात, हे पाहून ती निर्धास्त राहतील आणि घरातल्याप्रमाणेच बाहेरही वागायचा प्रयत्न करतील. बाहेरच्या वस्तू तुमच्याप्रमाणे समंजस नसतील आणि त्यामुळं कोणी त्यांच्या मार्गातून दूर जाणार नाही आणि त्यांचे अपघात टळणार नाहीत. यासाठी तुम्ही कनवाळूपणा दाखवून त्यांना निर्धास्त ठेवू नका. त्यांना बाह्य जगतातले टक्केटोणपे खायचे आहेत. अनेक वाईट अनुभवांना त्यांना तोंड द्यायचं आहे. तेव्हा त्यांना या संकटांची कल्पना येऊ द्यात, त्यांना कसं तोंड द्यायचं, हे शिकू द्यात. मुलं पडली - धडपधडली नाहीत, तर त्यातून सावरायला ती शिकणार कशी? म्हणून, बाबांनो, तुम्हांला हात जोडून विनंती, की तुम्ही पूर्वीसारखं वागायला लागा, असं वेड लागल्यागत वागू नका.''

इरावतीबाईंनी या निबंधातून मांडलेला विचार अतिशय मोलाचा आहे. वरवर पाहता बालमानसशास्त्राशी संबंधित वाटणारा हा निबंध केवळ तेवढ्याच मर्यादित हेतूने लिहिलेला नाही, हे वेगळे सांगायला नको. तो शिक्षणशास्त्राशीही संबंधित आहे, तसाच समाजशास्त्राशीही निगडित आहे. आपण चुकतो आहोत, याची कल्पनाच समाजातील घटकांना नसते. त्या चुकीची जाणीव करून देण्याचा एक मार्ग म्हणजे, त्या चुकीसाठी आपल्याला काही शासन होतं, हे त्यांना समजून देणं हा होय. त्यांच्या चुकांवर पांघरूण घालून त्यांना आंधळेपणे वागू देणे हा मार्ग नव्हे.

समाजातल्या इतर क्षेत्रांची गोष्ट सोडून केवळ शिक्षण क्षेत्रावर जरी नजर टाकली, तरी आपल्याला सहज दिसून येतं, की त्या क्षेत्रातील जबाबदार यंत्रणा हल्ली विद्यार्थ्यांच्या बाबतीत फारच सहानुभूती दाखवू लागल्या आहेत. प्राथमिक शिक्षणाच्या स्तरावर पूर्वी शिक्षक खूप कडक असत. एखादा विद्यार्थी वारंवार गैरहजर राहू लागला, तर शिक्षक त्याची उचलबांगडी करून शाळेत आणवत असत. शाळेत आल्यानंतर रूळ अथवा छडीने त्याला मार देत असत. कधी घोडी, कधी खुर्ची, कधी कोंबडा असल्या नामांकित शिक्षा करून त्याला आपल्या चुकीची कायमची आठवण राहील, असा बंदोबस्त करत असत. त्यामुळे विद्यार्थी गैरहजर राहायला घाबरत असत. गृहपाठ आणला नाही, पाठांतर झालं नाही, की अशाच कडक शिक्षा दिल्या जात असत. आज सर्व शिक्षा कायद्यानेच बंद करण्यात आलेल्या आहेत. काही शिक्षक अविचाराने वागून या शिक्षा वापरून मुलांवर शारीरिक-मानसिक अत्याचार करण्याची शक्यता लक्षात घेऊन या शिक्षा बंद झाल्या, हे एका परीने ठीकच झालं. पण अजिबात शिक्षाच नकोत, हे मात्र पटण्यासारखं नाही.

शाळा-कॉलेजांतही हे सहानुभूतीचं धोरण पसरलेलं आहे. विद्यार्थ्यांचे शाळेतील अथवा कॉलेजातील उपस्थितीचे दिवस कमी भरले, तर पूर्वी त्यांचा फॉर्म बोर्डाकडे अथवा विद्यापीठाकडे पाठवला जात नसे. अनेक थोरा-मोठ्यांना या शिक्षेचा बडगा बसल्याचं त्यांनी आपल्या लेखनात नमूद करून ठेवलेलं आहे. हल्ली मात्र मुख्याध्यापक, प्राचार्य यांना विद्यार्थ्यांबद्दल एवढी सहानुभूती निर्माण झाली आहे, की ही शिक्षा जवळ जवळ रद्दबातल झाली आहे. विद्यार्थीही त्यामुळे हजेरीबद्दल अत्यंत बेफिकीर झालेले दिसून येतात.

तीच गोष्ट परीक्षांची. परीक्षेत गुण कमी पडले, तर पूर्वी नापास केले जात असे. पण आता विद्यार्थ्यांना एखाद-दुसऱ्या पेपरात गुण कमी पडले, तर निरनिराळ्या प्रकारचे नियम लावून गुण वाढवून देण्याची सोय आहे. कॉपी, करणं हे वाईटच, पण आम्हांला लगेच विद्यार्थ्यांच्या पास होण्याची चिंता वाटते आणि मग 'करू दिली थोडी कॉपी, तर काय बिघडणार आहे?' असा सहानुभूतिपूर्ण विचार करून विद्यार्थ्यांच्या कॉपीकडे दुर्लक्ष केलं जातं. तिचा सराव होऊन सामूहिक कॉपीचे प्रयत्न होतात. त्यात शिक्षकही सहभागी होतात व विद्यार्थ्यांना कॉपी करण्यास मदत करतात. कधी कधी

सामूहिक कॉपी करू देण्याची जाहीर मागणीही केली जाते.

विद्यार्थी एका जरी विषयात नापास झाला, तरी तो नापास समजण्यात येते. पण पूर्वीदेखील एखाद-दुसऱ्या विषयात नापास झालेल्याला वरच्या वर्गात ढकलण्याची शाळांमधून पद्धत होती. आता ते लोण विद्यापीठाच्या परीक्षांपर्यंतही पसरलं आहे. विद्यार्थ्यांचं वर्ष वाया जाऊ नये, म्हणून हल्ली विद्यापीठातून दोन किंवा तीन विषयांत नापास झालेल्यांना पुढच्या वर्गात बसण्याची परवानगी देण्यात येते. विषयांची ही संख्या वाढवावी किंवा संख्येची अटच पूर्णपणे काढून टाकावी, म्हणून हल्ली आंदोलनं होताना आढळतात.

परीक्षेत विद्यार्थ्यांनी विचारलेल्या प्रश्नांची उत्तरं बिनचूक लिहावीत, अशी अपेक्षा असते. त्या उत्तरांतील चुकांच्या तारतम्यांवरून त्यांना गुण द्यावेत, अशी अपेक्षा असते. सर्वच उत्तर चूक असेल, तर अर्थात शून्य गुण द्यावेत, असाही संकेत असे. पण आता याही बाबतीत शिक्षक/प्राध्यापक फार सहानुभूतिपूर्ण झालेले आहेत. विद्यार्थ्यानं दोन-चार पानं, काही का होईना, लिहिलंय् ना, या सबबीवर त्याला गुण देण्याचे संकेत आता रूढ होऊ लागले आहेत. मग विद्यार्थ्यानं संबंधित उत्तराऐवजी सिनेमाची गोष्ट लिहिली, तरी त्याला गुण दिले गेल्याची उदाहरणं आहेत. ते विद्यार्थीच पुढे आपल्या पराक्रमाचे किस्से रंगवून सांगताना दिसतात. या सर्व प्रकारात शुद्धलेखन, सुवाच्य अक्षर, मुद्देसूद लेखन या गोष्टी किरकोळ ठरू लागल्या आहेत.

एम्. फिल्., पीएचूडी. या परीक्षांत विद्यार्थ्यांनी स्वतः संशोधन करून स्वतंत्रपणे एखाद्या विषयावर प्रबंध लिहायचा असतो. पण काही हिकमती विद्यार्थी बेमालूमपणे दुसऱ्याच्या प्रबंधातील बराचसा भाग नकलून स्वतःच्या नावाने तो प्रबंध सादर करतात. अशी अनेक उदाहरणं उघडकीस आली आहेत. अशा हिकमती ज्यांना जमणार नाहीत, त्यांचे मार्गदर्शक त्यांच्या मदतीस येतात. मग त्याच्या अगदीच सुमार असलेल्या लेखनाला फोटो, नकाशे, फापटपसाऱ्यांनी भरलेली परिशिष्टं, इ.ची जोड देऊन त्याला बाळसेदार बनवलं जातं. मग सुंदर मुद्रण, सुंदर कागद, सुंदर बांधणी यांची सजावट करून तो प्रबंध सादर करण्यात येतो. इतकंही करून पितळ उघडं पडू लागलं, तर मार्गदर्शक आपलं ठेवणीतलं अस्त्र बाहेर काढतात. 'हा विद्यार्थी फार निकृष्ट स्तरातला आहे, त्याच्या घरी विद्याव्यासंगाचं वातावरण नाही, अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत त्यानं हे संशोधन केलं आहे, तेव्हा त्याचा सहानुभूतिपूर्वक विचार करावा,' अशी परीक्षकांकडे विनंती करण्यात येते. हे परीक्षकही साटेलोटे करणाऱ्यांपैकी असतील, अशी दक्षता घेण्यात येते आणि अशा सहानुभूतिपूर्ण वातावरणात तो प्रबंध मान्य होतो; आणि विद्यार्थी पीएच्.डी./एम्.फिल्. चा शिक्का घेऊन बाहेर पडतो.

शिक्षण-क्षेत्रातला हा सहानुभूतिपूर्ण बनाव लक्षात आल्यामुळे हल्ली विद्यापीठीय पदव्यांना मान राहिलेला नाही. त्यामुळे या पदव्या घेऊन व्यवसायात प्रवेश करू पाहणाऱ्यांसाठी सेट, नेट अथवा विविध चाचण्या यांची भिंत हल्ली उभी करण्यात

आलेली आहे. ही भिंत सहानुभूतीमुळे अजून तरी पाझरलेली दिसत नाही. त्यामुळे आमच्या या सहानुभूतीला सरावलेल्या विद्यार्थ्यांची फार कुचंबणा होत आहे. या परीक्षांचे निकाल दहा टक्क्यांच्या आसपास लागत आहेत. या भिंतीपुढे तीन तीन-चार चार वेळा डोकं आपटून घेतलं, तरी उपाय चालत नाही. म्हणून आता या परीक्षाच रद्द करा. या परीक्षा म्हणजे विशिष्ट वर्गाचा कावा आहेत, इ. ओरड सुरू झाली आहे.

मुक्त अर्थव्यवस्थेमुळे आता परदेशी कंपन्या आपल्या देशात कारखाने उभारू लागल्या आहेत. त्यांचे पगार फार आकर्षक आहेत. पण त्यांची गुणवत्तेची अपेक्षाही फार मोठी आहे. आपल्या नोकरवर्गाची निवड ते आपल्या स्वतःच्या कसोट्यांनी करणार, हे उघड आहे. तेथे आमच्या विद्यापीठांनी पदव्या देऊन अनुगृहीत केलेल्या विद्यार्थिवर्गाची वर्णी कशी लागेल, याची शंकाच आहे. पुढे येणाऱ्या स्पर्धेच्या वातावरणात आमच्या या सहानुभूतीला सोकावलेल्या विद्यार्थ्यांची दशा केविलवाणी होईल. तेव्हा वेळीच इरावतीबाईप्रमाणे या वेड लागलेल्या समाजघटकांना विनंती करण्याची वेळ आली आहे.

"बाबांनो, आपली सहानुभूती आता जरा कमी करा आणि आमच्या पोरांना कठीण प्रसंगांना सामोरं जायला शिकू द्या."

**कल्याण काळे**

❑❑

**राजकारणाचा प्रभाव**

१. मराठीच्या अभिवृद्धीसाठी स्थापन झालेल्या एका नामवंत विद्यापीठच्या परिपत्रकातील एक वाक्य. (त्यावरील राजकीय पुढाऱ्याच्या भाषणाची छाप वाचकांच्या लक्षात येईल.)

"सर्व संबंधितांना या परिपत्रकाद्वारे असे आवाहन करण्यात येते की, सोमवार दि. १ जानेवारी, १९९६ पासून कार्यालयाच्या बदललेल्या वेळेची नोंद घेऊन त्याप्रमाणे कार्यालयात हजर रहावयाचे आहे."

# कथन-ज्ञानदेवांचे

माधव ना.आचार्य

१) 'संतसाहित्यातील कथनसरणी' या लेखात (पाहा - 'भाषा आणि जीवन', अंक १३.२ : उन्हाळा, १९९५ - पृ. ४) संतकवींच्या कथनसरणीचे सामान्य विशेष नोंदले होते. त्यांमध्ये आरंभीच संत, पंत, व्यास व कवी या वृत्तिविशेषांचा उल्लेख करून असे म्हटले होते, की 'एकाच कवीमध्ये यांपैकी एकाहून अधिक वृत्तिविशेष आढळून येणे स्वाभाविक आहे. उदा., ज्ञानदेवांच्या कथनात संतवृत्ती व कविवृत्ती यांचे.... विलयन आढळून येते,' (पू.)

याच भूमिकेतून ज्ञानदेवीतील कथनाचे स्वरूप आता प्रस्तुत लेखात लक्षात घ्यावयाचे आहे.

२) **धर्मकीर्तन :** ज्ञानदेव भगवद्गीतेला 'अध्यात्मशास्त्र' म्हणतात. ज्ञानदेवीच्या अठराव्या अध्यायात या शास्त्राचे टप्पे सादर करताना ते म्हणतात,

*एवं वेदाचें मूलसूत्र। सर्वाधिकारैकपवित्र।*
*श्रीकृष्णें गीताशास्त्र । प्रकट केलें।।*
*मोक्षदानीं स्वतंत्र । ज्ञानप्रधान हें शास्त्र।*
*येतुलालें दूजां सूत्र। उभारिलें।। (१८.१४१६ व १४२६)*

अशा या ज्ञानप्रधान शास्त्रावर चढविलेले 'देशीकार लेणें' म्हणजे ज्ञानदेवी. (१८ /१७८४)

या लेण्याला ज्ञानदेवांनी 'कथा' असेही म्हटले आहे. कारण त्यांच्या मते महाभारत ही 'गहन कथा' व त्यातील 'गीताख्य प्रसंग' हा 'कमलपराग' च. (१.५०) तेव्हा 'गीता' हे शास्त्र असेल, परंतु ते शास्त्र श्रीकृष्णाने अर्जुनाला सांगणे ही एक 'घटना'; एक 'प्रसंग'.

अशी ही 'घटना' ज्ञानदेवांनी श्रोत्यांसमोर उभी केली आहे. या प्रक्रियेला ते **'धर्मकीर्तन'** म्हणजे **'धर्माचे मंदिर'** म्हणतात. (ढेरे १२) जशी मंदिराची, तशी या कथेची रचना ज्ञानदेवांनी केली. परंतु याचे श्रेय ते श्रोत्यांना देतात. ते म्हणतात,

*किंबहुना तुमचें केलें। धर्मकीर्तन सिद्धी गेलें।*
*एथ माझें जी उरलें। पाइकपण ॥ (१८.१७७१)*

'मंदिर तुमचे, सेवकपण माझे'. 'हे मी केले' असे ज्ञानदेव म्हणत नाहीत. कारण कोणत्याही कर्माचे कर्तेपण व भोक्तेपण स्वतःकडे घेणे हाच 'कर्मबंध'. ज्ञानदेव म्हणतात,

*तैसा कर्तृत्वाचा मदु। आणि कर्मफलिचा आस्वादु।*
*ययां दोहिं चि नावं बंधु। कर्माचा किं॥ (१८.२०३)*

हाच त्यांच्या दृष्टीने गीता सांगण्याच्या घटनेचा अर्थ आहे. हाच 'कथार्थ'. हा सांगणारी ज्ञानदेवी ही एक 'शांतिकथा'. तेराव्या अध्यायात ज्ञानदेव म्हणतात,

*एवं जे महाभारतीं । व्यासें अप्रांतमतीं ।*
*भीष्मपर्वि शांतिं। म्हणितली कथा॥*
*तो कृष्णार्जुनसंवादु । नागरिं बोलिं विशदु।*
*सांघों दाउं बंधु। वोवियेचा॥ (१३.११४८ व ११४९)*

तेव्हा भीष्मपर्वामध्ये शांतरसात सांगितलेली कथा ज्ञानदेव ओवीबंधामध्ये बांधीत आहेत.

**३) 'शांतिकथा' म्हणजे काय?** : भरतांच्या नाट्यशास्त्राचा टीकाकार अभिनवगुप्त (अभिनवभारती - इ.स. १० वे शतक) याच्या मते शांतरस ही सर्व रसांची प्रकृती आहे. ती सर्व रसांना समान आहे. आत्मज्ञान (म्हणजे इतरांहून भिन्न असलेल्या आत्मस्वरूपाचे ज्ञान) हा त्याचा स्थायी होय.

या स्थायीचा वेगळा निर्देश भरतांनी का केला नाही, याचे उत्तर देताना अभिनवगुप्त म्हणतो,

"रती इत्यादी चित्तवृत्ती या आत्मरूप भिंतीच्या आश्रयाने येतात, तेव्हाच त्यांना स्थायी म्हटले जाते. परंतु आत्मज्ञान हे मुळातच सर्व चित्तवृत्तींना आधारभूत भिंतीसारखे असल्यामुळे ते स्वभावतःच 'सिद्ध स्थायी' आहे. म्हणून त्याची स्वतंत्र गणना करण्याचे कारण नाही."

'रतीसारखी चित्तवृत्ती कवी वा नट यांच्या व्यापारामुळे आस्वादयोग्य होते. त्यामुळे प्रेक्षकांना शृंगाररसाचा अनुभव येतो. मग आत्मज्ञानासारखा सर्व चित्तवृत्तींच्या ठायी असलेला भाव कविव्यापारातून आस्वादयोग्य झाला, तर त्याची रसात परिणती का होऊ नये?' - असा अभिनवगुप्ताचा मार्मिक प्रश्न आहे.

शांतरसाचा आस्वाद कसा घेतला जातो? अभिनवगुप्ताचे म्हणणे असे :





अनुक्रमणिका

'सामान्य माणसाचे आत्मस्वरूप रती, उत्साह, इत्यादी विकारांनी कलुषित झालेले असते. परंतु मध्येच त्याला आत्म्याच्या विशुद्ध रूपाची जाणीव होते. शांत रसात परिणत होणाऱ्या प्रसंगचित्रामुळे त्याला या विशुद्ध रूपाची ओळख पटते व त्यामुळे त्याला आनंद होतो.' (नाट्यशास्त्र, ६.८२ टीका)

ज्ञानदेव यालाच 'परतत्त्वस्पर्श' म्हणतात. असा स्पर्श करणारे प्रसंग, व्यक्तिचित्रे ज्ञानदेवीत सर्वत्र भेटतात. म्हणून ती 'शांतिकथा'.

**४) या 'शांतिकथे' तील तीन घटना :** ज्ञानदेवीमध्ये अर्जुनाच्या मोहमुक्तीचा प्रवास कथन केलेला आहे. या प्रवासाचे तीन टप्पे म्हणजे या शांतिकथेतील तीन घटना आहेत. त्या आता क्रमाने लक्षात घेऊ.

**४.१) अर्जुनाची मोहग्रस्तता :** रणांगणावर स्वतःचे आप्त व गुरू यांना पाहिल्यानंतर अर्जुन मोहग्रस्त झाला. हातीचे शस्त्र खाली ठेवून तो म्हणाला,

*हे ऐसे रणिं वधावे। मग आपण राज्यसुख भोगावें*
*हें मना नैये आघवें। जीविनेंसिं॥*
*नातरि देशत्यागें जाइजे। कां गिरिकंदर सेविजे।*
*परि शस्त्र आतां न धरिजे। ययांवरि॥ (२.४५ व ४७)*

अर्जुनाची ही मोहग्रस्तता कशामुळे होती? 'मी कर्ता' या अहंकारामुळे. म्हणून श्रीकृष्णांनी प्रथम उतारा दिला, तो या 'अहं' विषावरच. ते म्हणाले, 'तू, रे, कोण यांना मारणारा?

*तूं आपणपें तरि नेणसि। परि या कौरवातें शोचुं पाहासि।*
*हा बहुत विस्मयो आम्हांसि। पुडुतीं पुडुतीं॥*
*तरि सांघ पां अर्जुना। तुजपासौनि स्थिति त्रिभुवना।*
*हे आदि विश्वरचना। तें लटिकें काइ॥ (२.९४.९५)*

तुला जर स्वतःचेही ज्ञान नाही; आणि या कौरवांसाठी खेद मात्र करीत आहेत. आम्हांला याचे राहून राहून आश्चर्य वाटते. या त्रिभुवनाचे अस्तित्व काय तुझ्यामुळे आहे? मग ही विश्वरचना फार आरंभीची आहे. असे म्हणतात, ते काय खोटे?'

येथील 'आपणपें' हा शब्द महत्त्वाचा आहे. 'आपणपें' म्हणजे स्वतःचे ज्ञान – आत्मज्ञान. हे नसते, ते अज्ञान. म्हणून अज्ञानाचे लक्षण करताना ज्ञानदेव सांगतात,

*आपुला आपणेयां। विसरू जो धनंजया।*
*तें गा रूप येया। अज्ञानांसि॥ (१४.७१)*

स्वतःला न ओळखणे म्हणजे दुसऱ्या शब्दांत 'स्वतःला 'सत्' हून कोणी तरी वेगळाच मानणे.' हे 'वेगळे मानणे' का घडते? अर्थात देहबुद्धीमुळे. पहिल्या लेखात ज्ञानदेवकृत संतलक्षण नोंदताना आपण देहबुद्धी व आत्मबुद्धी यांतील विवेकाचा उल्लेख केलाच आहे. (पाहा : भाषा आणि जीवन : १३.२ : पृ.५)

ज्याचा हा विवेक जागा असतो, तो हे जाणतो की, मी सत् चाच अंश आहे. त्यामुळे मग देहबुद्धीचे अपत्य जो अहंकार, त्यापासून तो मुक्त होऊ लागतो. 'मी कर्ता, मी भोक्ता' या अहंकाराच्या पलीकडे जाऊन तो प्राप्त कर्तव्य अलिप्त मनाने करीत राहतो.

अशा अहंमुक्तांची चित्रे ज्ञानदेवीत विविध संदर्भांमध्ये ज्ञानदेवांनी रेखाटली आहेत. ही व्यक्तिचित्रे या शांतिकथेच्या विभावस्थानी आहेत.

अर्जुनाच्या मोहग्रस्ततेच्या या पहिल्या घटनेच्या संदर्भातील हे ज्ञानदेवांचे कथार्थानुसारी भाष्य आहे, असे म्हणायला हरकत नाही. संत, गुणातीत, योगी, भक्त अशा व्यक्तिप्रतिमांतून हे भाष्य सरूप होते.

**४.२) विश्वरूपदर्शन :** अर्जुनाच्या मोहमुक्तीच्या मार्गावरील महत्त्वाचा टप्पा म्हणजे विश्वरूपदर्शन. यामध्ये सर्वांना गिळणारा एक महाकाल आहे. कसा आहे तो?

'सारे काही गिळण्यासाठी वखवखलेला. त्याने समुद्र जणू एका घोटात पिऊन टाकला, पर्वतांचा एकच घास केला; दिशा गिळून टाकल्या व चांदण्या चाटून टाकल्या. एखादे कवठ वडवाग्नीमध्ये टाकावे, तसे अवघे त्रिभुवन याच्या जिभेच्या शेंड्यावर टेकलेले होते.' (११.४२६ व ४२८)

अशा या महाभयंकर कालाच्या दर्शनाची ही घटना येथे कशासाठी येते?

ज्ञानदेव सांगतात :

*जें मीं मारिता कौरव मरते। ऐसेनि वेंटाळिला असे भ्रांतें।*
*तें फेडावेया चि लागि अनंतें। दाविलें निज।।*
*अरे कोण्ही कव्हणातें न मरी। एथ मीं चि हो सर्वसंहारीं।*
*तें विश्वरूप व्याजें श्रीहरी। प्रकटितसे।। (११.४०२-४०३)*

'मी मारणारा, कौरव मरणारे' या भ्रमाने गुरफटून गेलेल्या अर्जुनाला त्यातून बाहेर काढण्यासाठी श्रीकृष्णाने हे निजस्वरूप दाखविले. कोणीही कोणाला मारीत नसतो. येथे सर्वसंहारक आहे, तो मीच, हे श्रीकृष्णाने येथे विश्वरूपाच्या निमित्ताने व्यक्त केले.

या घटनेमुळे अर्जुनाच्या बुद्धीवरील मोहाचे पटल दूर होऊ लागते.

**४.३) मोहमुक्ती व कर्मप्रवृत्ती :** हा प्रवासाचा अखेरचा टप्पा. येथे श्रीकृष्ण विचारतात,

'धनंजया, तुझा अज्ञानसंमोह नष्ट झाला ना?' (गीता १८.७२) येथील 'अज्ञानसंमोह' हा समास दोन प्रकारे सोडविता येतो. दोन्ही पदांमध्ये सामानाधिकरण्य

मानून कर्मधारय (अज्ञानं एव संमोहः) किंवा वैय्यधिकरण्य मानून तत्पुरुष (अज्ञानात् जातः संमोहः). श्रीकृष्णाच्या प्रश्नावर अर्जुनाचे उत्तर असे आहे :

'माझा मोह नष्ट झाला; मला स्मृती प्राप्त झाली.' (गीता १८.७३) या उत्तरावरून 'अज्ञानसंमोह' हा तत्पुरुष समास ठरतो. कारण अज्ञानामुळे संमोह व मोह नाशामुळे स्मृतिलाभ - असा कार्यकारणभाव येथे सूचित झाला आहे. येथे 'स्मृती' म्हणजे स्वतःला ओळखणे - आत्मज्ञान.

उपर्युक्त श्लोकावर भाष्य करताना ज्ञानदेव लिहितात -

*आतां मोहो असे किं नाहिं। हें ऐसें पूससी काई।*
*कृतकृत्य जालां पाहीं। तूझेपणें।।*
*मी तुझेनि प्रसादें। लाधलेनि आत्मबोधें।*
*मोहाचे तेया कांदे। नेंदिसी चि उरों।।*
*आतां करणें न करणें। हें उठी जेणें दूजेपणें।*
*तें तूं वांचौनि नेणें। सर्वत्र गा।।*
*इये विखिं माझां ठांइं। संदेहाचें नूरे चि कांहि।*
*त्रिशुद्धी कर्म जेथ नाहिं। तें मिं जालां।। (१८.१५४८ ते १५५१)*

आत्मज्ञानाच्या प्राप्तीमुळे अर्जुनाच्या ठिकाणी मोहाचे कंदही राहिले नाहीत. कर्म व अकर्म हा भेद द्वैतभावामुळे होता; परंतु श्रीकृष्णरूप 'सत्' तेच 'मी' या जाणिवेमुळे 'करणे, न करणे' हा भेद संपला. संदेहाचे नावही शिल्लक राहिले नाही. त्यामुळे 'कर्माचा अभाव' ही स्थिती अर्जुनाला प्राप्त झाली. आता तो जे कर्म करणार आहे, ते त्याचे नव्हे, तर भगवंताचे असेल.

'मी कर्ता' या अहंमधून मुक्त झालेल्या जीवाकडून घडणारे कर्म - हा कर्माचा अभावच.

इथे एक प्रश्न उपस्थित करता येण्याजोगा आहे. आत्मज्ञानाच्या प्राप्तीनंतर अर्जुन युद्धासारख्या संहारक कृत्याला प्रवृत्त होतो, हे त्याचे कृत्य शांतरसाचे कसे?

असा प्रश्न आनंदवर्धन (व अभिनवगुप्त) यांनी उपस्थित केला आहे. त्यांच्या मते, दयेने व **धर्मभावनेने** प्रेरित होऊन केलेले पराक्रमाचे कृत्य वीररसाचे नव्हे. कारण ते अहंकाररहित असते. त्यामुळे हा शांतरसच आहे. (ध्वन्यालोक ३.२६ व त्यावरील लोचन)

ज्ञानदेवही म्हणतात :

*आगा करितेन विण कर्म। तें चि तें नैष्कर्म्य।*
*हें जाणति गुरुगम्य । सुवर्ण जे।। (५.६३)*





अनुक्रमणिका

'करितेन विण कर्म' म्हणजे जेथे कर्तृत्वाचा अहंकार लोपला आहे, असे कर्म.

अशा प्रकारे ज्ञानदेवीतील 'शांतिकथा' सफल संपूर्ण होते.

**५) आनुषंगिक घटनानिर्देश** : ज्ञानदेवीतील प्रमुख घटना पाहिल्यानंतर काही आनुषंगिक घटनांचे निर्देश पाहू. यांतील एक घटना मूळ गीतेतीलच आहे, परंतु ज्ञानदेवांनी तिला आपले कालोचित भाष्य जोडले आहे. दुसरी घटना ही मूळ विचाराच्या भाष्यासाठी येणारी अवकाशबद्ध घटना आहे. या उदाहरणांवरून घटना, अवकाश व भाष्य यांचे आंतरसंबंध किती वेगवेगळया पातळयांवर येऊ शकतात, हेही लक्षात घेता येईल.

**५.१) 'लोकोऽयं कर्मबंधनः'** : भगवद्गीतेच्या तिसऱ्या अध्यायात कर्मप्रशंसायोगाच्या विवेचनात श्रीकृष्ण सांगतात, 'यज्ञार्थ कर्माशिवाय अन्य कर्म करणे हे सर्व जगाला बंधनकारक आहे.' (गीता ३.९) या संदर्भात ते सृष्टिनिर्मितीच्या वेळची एक घटना सांगतात. ते म्हणतात, 'पूर्वी यज्ञासह प्रजांची निर्मिती करून प्रजापतीने देवांना यज्ञाने संतुष्ट करण्यास सांगितले. अशा प्रकारे संतुष्ट झालेले देव प्रजाजनांना इष्ट भोग देतील. या प्रकारे एकमेकांना संतुष्ट करून तुम्ही श्रेष्ठ कल्याण मिळवाल.' (पू.१० ते १३)

या घटनेच्या निवेदनातील 'यज्ञार्थ कर्म' हे शब्द महत्त्वाचे आहेत. 'यज्ञो वै विष्णु:' या श्रुतिवचनानुसार भाष्यकारांनी या शब्दांचा 'ईश्वरार्थ कर्म' असा अर्थ केला आहे.

ज्ञानदेव मात्र येथे स्वकालोचित असा वेगळा अर्थ करतात.

ते म्हणतात,

*स्वधर्मु जो बापा। तो नित्ययज्ञु जाण पां। (३.८१)*
*म्हणौनि स्वधर्मानुष्ठान। तें अखंड तुज यजन।*
*जो करी तेया बंधन । कहीं नाहीं।। (३.८३)*

वर्णाश्रमविहित कर्म हाच स्वधर्म, हाच नित्ययज्ञ – असा ज्ञानदेवांचा अभिप्राय आहे.

पुढे सोळाव्या अध्यायातही दैवी संपत्तीच्या विवेचनात 'यज्ञ' हा शब्द येतो, तेथेही त्यांनी 'वर्णधर्मानुसार फलाशा सोडून प्राप्त कर्तव्य करणे' असाच अर्थ केला आहे. (१६.९५.९६)

तिसऱ्या अध्यायातील उपर्युक्त घटनेच्या विवेचनात ज्ञानदेव केवळ 'स्वधर्माचरण करा', एवढेच सांगून थांबत नाहीत. तर तुम्ही 'काय करू नका' - हेही सांगतात. या निषेधांमध्ये त्यांनी 'व्रतनियम, देहदंडादी उपासना, तीर्थयात्रा, काम्य पूजाविधी, मंत्र यंत्र विधाने, विविध देवतांची उपासना' अशा स्वकालीन धर्माचरणांचा उल्लेख केला आहे. (३.८९ ते ९१)





अनुक्रमणिका

विविध प्रकारच्या व्याज धर्माचरणांनी बुजबुजलेला ज्ञानदेवांचा काळ लक्षात घेतला की, त्या पार्श्वभूमीवर ज्ञानदेवांनी केलेले हे भाष्य महत्त्वाचे ठरते. म्हणूच याला 'अवकाशभाष्य' म्हणायला हरकत नाही.

५.२) **अवकाशबद्ध घटना** : ही दुसरी घटना थोडी वेगळ्या प्रकारची आहे. ती एका शब्दाच्या स्पष्टीकरणासाठी आली आहे. सतराव्या अध्यायात दानांचे प्रकार स्पष्ट करताना ज्ञानदेव **तामस** दानाचे वर्णन करताना एक स्वकालीन प्रसंगचित्र रेखाटतात. ते चित्र असे आहे :

*मग म्लेंछांचें वसैठे। दांगाणें हान कैकटें।*
*कां सिहबीरें चौहटे। नगरिचे तें।।*
*तिहीं तिहिं ठाइं मीलनीं। समो सांजवेल कां रजनी।*
*तेव्हलिं उदारां होणें धनीं। चोरियेचां।।*
*पात्रें भाट नागारी। सामान्या स्त्रिया जुवारी।*
*जियें मूर्त्तिवंतें भुरुरीं। भूलावेया।।*
*रूपनृत्याची पुरवणी। तेयां पुढें डोलेभारणीं।*
*गीत भाटीवं श्रवणीं। कर्णजपु।।*
*तेया ही वरि अलुमालु। घे फूलागंधाचा परिमलु।*
*तवं भ्रमांचा तो वेतालु। अवतरे चि।।*
*येयां ऐसेन जें जें देणें। तें तामस दान मीं म्हणें।.... (१७.२९३ ते २९८ पूर्वार्ध)*

या घटनाचित्राला प्रा. म.वा.धोंड यांनी 'ज्ञानेश्वरीतील तमाशा' असे अन्वर्थक नाव दिले आहे. त्यांच्या शब्दांत हे दृश्य असे आहे :

'म्लेंछांची वस्ती, रानाजवळील मोकळा माळ, कैकाडी लोकांची वस्ती, शिबिर किंवा शहराचा चव्हाटा यांसारख्या ठिकाणी, संध्याकाळी किंवा रात्री, नर्तकी, भाट, पवाडे गाणारे नागारी, वेश्या, जुगारी यांसारखे भुरळ घालणारे आपले खेळ मांडतात. ते पाहण्याकरिता चोरीमारी करून धन संपादन केलेले लोक गोळा होतात. त्यांच्यासमोर नर्तकी संपादणी-बतावणीसह नृत्य करून त्यांना उत्तेजित करतात, डोळे मोडून त्यांना विव्हल करतात, शृंगारिक गीते गाऊन त्यांना पेटवतात, भाट-नागारी त्यांची लटकीच स्तुती करून त्यांना फुगवतात आणि मग त्यांच्यांतीलच एखादी नर्तकी वा वेश्या एखाद्या उल्लू श्रोत्याच्या जवळ येऊन त्याच्या कानात कुजबुजते. कानात कुजबुजते वेळी तिचे डोके त्याच्या नाकाजवळ आल्यामुळे तिच्या केसांतील फुलांचाच नव्हे, तर तिच्या केसांचा व अंगाचाही वास त्याच्या मस्तकात शिरतो आणि त्याच्या मनात मोहाचा वेताळ संचारतो. तो तत्काळ आपल्या कमरेचा कसा सोडून लोकांना नाडून मिळविलेली सर्व संपत्ती तिच्यावरून ओवाळून टाकतो. असे हे 'तामस' दान.' (धोंड १२६-१२७)



अनुक्रमणिका

'तामस दान' म्हणजे काय, हे स्पष्ट करण्यासाठी आलेले हे घटनाचित्रण ज्ञानदेवकालीन आहे. म्हणूनच त्याला 'अवकाशघटना' असे म्हणायला हरकत नाही. ज्ञानदेवांनी येथे ज्या स्वकालीन वस्तीचा उल्लेख केला आहे. तिलाच त्यांनी तिसऱ्या अध्यायात 'कोंढ' म्हटले आहे. तेथे कामक्रोधांचे वर्णन करताना ते म्हणतात,

*हे देहदुर्गिंचे डोंड । इंद्रियग्रामिचे कोंढ।*
*एयांचे व्यामोहादिक धवड। जगावरि।। (३.२३७)*

'कोंढ' ही गावकुसाबाहेरची वस्ती. जिचा उल्लेख उपर्युक्त सतराव्या अध्यायात 'म्लेछांचे वसैठे', 'कैकटें' असा केला आहे. येथील लोकांचे भुलविणारे उद्योग लक्षात घेतले, तर इंद्रिये घसरणार, ती इथेच, हे लक्षात येते. म्हणूनच येथे कामक्रोधांना 'इंद्रियग्रामिचे कोंढ' असे म्हटले आहे. (आचा २१)

या वस्तीचा उल्लेख ज्ञानदेवकालीन महानुभवीय ग्रंथातही मिळतो. 'दृष्टान्तपाठा'-तील 'बांदकरीयाचा दृष्टान्त' यामध्ये या वस्तीतील 'गाणे, भाटे, थोंटी, सीमुरे, रांधवणे, सामान्य स्त्रीया कालाळे' या लोकांचा निर्देश करतो. (दृष्टान्तपाठ - क्र. १६)

ज्ञानदेवांच्या कथनात स्वकालीन घटनाचित्रण येते, ते असे.

**६) प्रतिमाघटना :** ज्ञानदेवांचे अवघे बोलणेच प्रतिमायुक्त असल्यामुळे उपमानार्थ येणाऱ्या घटनांतून सूचित होणारे चित्रण ज्ञानदेवीत विपुल प्रमाणात भेटते. ज्ञानदेवांची ही उपमाने इतकी मार्मिक असतात, की ती उपमेयाची सर्व अंगे पुलकित करतात. खरे म्हणजे, तेथे उपमेय-उपमान वा प्रस्तुत-अप्रस्तुत असे द्वैत उरतच नाही; आणि म्हणून अशा घटनांना 'प्रतिमाघटना' असे म्हणायला हरकत नाही. समजुतीपुरती या प्रकारची फक्त दोन उदाहरणे पाहू :

**६.१) 'जिये उत्तमे कुलिचिया होंति' :** ज्ञानदेवीचा 'एक शांतिकथा' म्हणून विचार करताना जी अर्जुनाच्या मोहग्रस्ततेची पहिली घटना लक्षात घेतली, तिच्या संदर्भातील एक मार्मिक 'प्रतिभाघटना' अशी आहे – अर्जुन मोहग्रस्त झाला, तेव्हा काय घडले? ज्ञानदेव सांगतात,

*एथ मनीं गजबज जाली। आपैसी कृपा आली।*
*तेणें अपमानें निगाली। वीरवृत्ति।।*
*जिये उत्तमे कुलिचिया होंति। आणि गुणलावण्यें आथि।*
*तिया आणिकीतें न साहाति। सुतेजपणें।। (१.१८५-१८६)*

मोहग्रस्त अर्जुनाच्या मनात जी गडबड उडाली, तीमुळे दयेने त्याच्याकडे बिऱ्हाड थाटले. अर्जुनाची 'घरची' वीरवृत्ती यामुळे तत्क्षणीच तेथून बाहेर पडली. असे होणे

स्वाभाविकच होते. कारण ज्या स्त्रिया कुलीन असतात, गुणी असतात व रूपानेही उण्या नसतात, त्यांना आपल्या पंतीने सवत आणलेली कशी सहन होणार?

अर्जुनाचे स्वाभाविक शौर्य लोपले, हे सांगण्यासाठी ज्ञानदेवांनी योजलेली ही प्रतिमाघटना आहे.

६.२) **'अशोकाचे आगसे'** : अर्जुनाच्या मोहमुक्तीच्या प्रवासातील 'महाकाल' दर्शनाचा उल्लेख पूर्वी येऊन गेलाच आहे. (परि. ४.२) या महाकालाचे वर्णन करताना ज्ञानदेव सांगतात,

*अशोकाचे आगसे। चघळिले करभेनि जैसे।*
*लोकवक्त्रा माझी तैसे। वायां चि गेले।।* (११.४०९)

अशोकाचे शेंडे जसे उंटाने चघळावे, तसे या महाकालाच्या तोंडात शिरलेले लोक नष्ट होऊन गेले.

येथे प्रतिमार्थ आलेला 'अशोक' महत्त्वाचा आहे. अशोकवृक्ष दोन प्रकारचे असतात. एक जात सरळसोट वाढणारी शोभेची. दुसरी लाल अशोकाची फुलणारी. पौराणिक संस्कृतीत या अशोकाला महत्त्व आहे. हा अशोक वृक्ष दुःखपरिहारक आणि कल्पवृक्ष मानला जातो. पद्मपुराणात एक कथा आहे : एकदा शिवाला पार्वतीने या वृक्षाचे महत्त्व विचारले. शिव म्हणाला, 'हा कल्पवृक्ष आहे. याच्यापाशी तुला हवे ते माग.' पार्वतीने एक स्त्री मागितली. ती ताबडतोब पुढे उभी राहिली. पार्वतीने तिला आपली कन्या मानून 'अशोकसुंदरी' असे तिचे नाव ठेवले. 'तुझे नहुषाशी लग्न होईल', असा वर पार्वतीने तिला दिला. (उद्धृत - संको १. ३१३)

चैत्र शुद्ध षष्ठीला केले जाणारे 'अशोकव्रत' ही या संदर्भात उल्लेखनीय आहे. या व्रतात अशोकाचे पूजन करून त्याच्या सहा कळया, सहा मुगांचे दाणे मिसळून दह्याबरोबर खातात. त्यामुळे अपत्यप्राप्ती होते. (पू.)

असा हा अशोक. याची कोवळी पालवीच उंट खाऊन टाकतो. आता पालवीच नष्ट झाल्यामुळे कळया, फुले, शेंगा-बी, इत्यादी सर्वच नष्ट होते.

भारतीय युद्धात सारे कुरुकुलच नष्ट झाले. एक परीक्षित वाचला, तो श्रीकृष्णाच्या कृपेने. 'महाकाला' चे हे संहारक रूप प्रत्यक्ष करण्यासाठी आलेली उंट व अशोक यांची ही प्रतिमाघटना किती नेमकी आहे, हे सहज लक्षात येईल.

ज्ञानदेवांच्या कथनातील 'घटना' या घटकाचे स्वरूप आपण येथवर – शांतिकथेतील प्रमुख घटना, आनुषंगिक घटना व प्रतिमाघटना – अशा तीन पातळयांवर लक्षात घेतले. आता 'व्यक्ती' या घटकाचे स्वरूप लक्षात घेऊ.

७) **व्यक्ती** : ज्ञानदेवीतील बहुतेक महत्त्वाच्या व्यक्ती या तेथील विविध पातळयांवरील संवादांतून आपल्याला जाणवतात. या दृष्टीने त्यांना 'संवादघटित'

व्यक्ती म्हणायला हरकत नसावी.

गीता ही मुळातच श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादातून उभी राहते. या दोघांचा हा संवाद संजय धृतराष्ट्राला सांगतो. हे सर्व ज्ञानदेव आपले गुरू निवृत्तिनाथ यांच्या कृपादृष्टीखाली श्रोत्यांना सांगतात. पुन्हा पहिल्या अध्यायात गीतेची महती सांगताना शंकर व पार्वती यांचाही संवाद येतो. अशा संवादांतून ज्ञानदेवीच्या कथार्थाबरोबरीनेच त्या त्या व्यक्तींच्या व्यक्तित्वाचे अनेक पैलू आपल्याला जाणवत जातात.

अवकाश-घटनांप्रमाणेच ज्ञानदेवीत काही अवकाशव्यक्तीही आहेत. ज्ञानदेव ज्या काळात ही कथा सांगत आहेत, त्या काळातील एखादा अज्ञानी भक्त वा आसुरी संपत्तीचा पुरुष मूळ पदांच्या निरूपणासाठी ते समूर्त करतात.

प्रतिमाघटनांप्रमाणेच येथे प्रतिमाव्यक्तीही भेटतात. ज्ञानदेवांच्या बहुविध प्रतिमांप्रमाणेच या व्यक्तीही बहुविध आहेत.

अशा या तीन पातळ्यांवरील व्यक्तिचित्रणाचे स्वरूप आता काही उदाहरणांच्या साहाय्याने लक्षात घेऊ.

**७.१) संवादघटित व्यक्ती :**

**७.१.१)** पहिल्याच अध्यायात ज्ञानदेवांनी गीतेची महती सांगताना **शिव व पार्वती** यांचा एक संवाद दिला आहे. गीताशास्त्राच्या महतीविषयी पार्वतीने शिवांना 'चमत्कारौनि' प्रश्न विचारला. त्यावर ते म्हणतात,

*तेथ हरु म्हणे जेवि नेणिजे। देवी जैसे कां स्वरूप तुझें।*
*हें नित्यनूतन देखिजे। गीतातत्व॥ (१.७१)*

या संवादातून ज्ञानदेवांना जाणवलेले गीतेचे वैशिष्ट्य लक्षात येते. गीतातत्त्व हे सौंदर्याची, तशीच आनंदाची बीजभूमी. पार्वतीच्या प्रश्नातील 'चमत्कारौनि' हा शब्द महत्त्वाचा आहे. हा 'चमत्कार' म्हणजे साहित्यशास्त्रातील 'मनोविश्रांतिरूप निर्विघ्न संवेदना. शिवांनी पार्वतीच्या (व गीतातत्त्वाच्या) नित्यनूतन रमणीयत्वाचा उल्लेख केला आहे. यातून ज्ञानदेवांनीही आपल्या ग्रंथाचे काव्यरूप सूचित केले आहे.

**७.१.२) गुरू व शिष्य :**

गीतेचे मर्म ज्ञानदेवांना कळले, ते **गुरुकृपेमुळे.** अशा या गुरूंना उद्देशून नमनाच्या मिषाने ज्ञानदेव वारंवार बोलतात. गुरू मात्र क्वचितच बोलतात. म्हणूनच एके ठिकाणी ज्ञानदेव त्यांना म्हणतात,

*'मौन गा तूझें राशिनांव।' (१७.१५)*

असे हे गुरू जेव्हा क्वचित बोलतात, तेव्हा काय म्हणतात ? चौदाव्या अध्यायातील





अनुक्रमणिका

एक जागा पाहू. ज्ञानदेव म्हणतात,

*आगा विश्वैकधामा। तूझा प्रसादु चंद्रमा।*
*करू मज पूर्णिमा। स्फूर्तिची जी।।*
*जिया पाहिलें मातें। उन्मेखसागरिचें भरितें।*
*वौसंडेले तें । रस-वृत्तिचें।। (१४.२३-२४)*
यावर गुरू म्हणतात,
*तवं तौखोनि गुरूराजें। म्हणितलें विनतिव्याजें।*
*मांडिले देखों दुजें। स्तवुं तुवां।। (१४.२५)*

ज्ञानदेवांच्या बोलण्यामुळे गुरू संतुष्ट झाले खरे; पण ते म्हणतात,

'अरे या विनंतीच्या निमित्ताने तू आपणां दोघांमध्ये निष्कारण द्वैत मात्र निर्माण करीत आहेत.'

गुरूंची ही भूमिका ज्ञानदेवांना मान्य होतीच. म्हणूनच ज्ञानदेवीच्या समारोपात ते म्हणतात,

*तो सर्वोपकारी समर्थु। सद्‌गुरु श्रीनिवृत्तिनाथु।*
*राहाटतसे मज आंतु। रिगौनियां।। (१८.१७०७)*

गुरुशिष्यांचे हे अद्वैत हे ज्ञानदेवीतील प्रमेयाचे एक महत्त्वाचे अंग आहे. 'अमृतानुभवात' ही ज्ञानदेव म्हणतात,

*म्हणौनि शिष्य आणि गुरुनाथु। या दोहों शब्दांचा अर्थु।*
*श्रीगुरुचि परी होतु। दोहों ठायां।। (अमृतानुभव २.६१) (आचा १०-११)*

**७.१.३ संत श्रोते व वक्ता ज्ञानदेव** यांचा संवाद तर सतत चालू असतो. हे श्रोते कसे आहेत? ज्ञानदेव म्हणतात,

*प्रभू तुम्ही महेशाचिया मूर्ती। आणि मीं दुबला अर्चितसें भक्ति।*
*म्हणौनि बोलु जऱ्हीं गंगावती। तऱ्हीं स्वीकराल।। (९.१४)*

हे संत श्रोते म्हणजे प्रत्यक्ष शंकराचेच अवतार. ज्ञानदेव त्यांना 'स्वामी', 'बाप', 'माऊली' अशा संबोधनांनीही उल्लेखितात. या श्रोत्यांमुळेच ज्ञानदेवीचे हे 'धर्मकीर्तन' उभे राहिले आहे.





अनुक्रमणिका

हे श्रोतेही तसे मोठे रसिक आहेत. ज्ञानदेवांच्या विषयांतरातही ते रमतात. सहाव्या अध्यायात एक प्रसंग आहे. श्रीकृष्णांनी योगारूढ माणसाचे वर्णन केले. त्या वेळी त्याची जी लक्षणे त्यांनी सांगितली, ती (ज्ञानदेव म्हणतात) त्यांची स्वत:चीच होती. ती सांगताना श्रीकृष्ण स्वत:च अर्जुनाशी असलेला आपला ऐक्यभाव भोगू लागले. श्रीकृष्ण भक्तसुख अनुभवीत होते आणि ज्ञानदेव त्या दोघांचे ऐक्यसुख अनुभवीत होते. या नादात मूळचा विषय पडला बाजूला; परंतु त्याचे भान श्रोत्यांनाही राहिले नाही. कारण ते ज्ञानदेवांच्या कथनात रंगून गेले होते. श्रोते म्हणतात,

*.....कैसी बोलाची हवाव।*
*काइ नादातें हान वरिवं। जीणौनि आले।। (६.१३२)*

'केवढी ही बोलांची सुंदरता! श्रेष्ठता! काय हे बोल गानसौंदर्याला जिंकून आले, की काय?'

असे हे रसिक संतश्रोते आणखी एका ठिकाणी विषयांतराच्या शंकेने व्यथित झालेल्या ज्ञानदेवांना म्हणतात,

*......कें परिहारा ठाओ आहे।*
*भीसि कां वायां हें। कविपोषका।। (१३.८५१)*

संवादार्थ आलेल्या या सर्व जोड्यांमध्ये महत्त्वाच्या जोड्या दोन आहेत. एक श्रीकृष्ण व अर्जुन; दुसरी संजय व धृतराष्ट्र.

यांचा थोडा अधिक परिचय करून घ्यायला हवा.

**(७.१.४) श्रीकृष्ण व अर्जुन :**

श्रीकृष्णाचे व्यक्तित्व तीन पातळ्यांवर जाणवते. पहिली श्रीकृष्णाच्या साकार-सगुण रूपाची. हा श्रीकृष्ण अर्जुनाचा सारथी व सखा. दुसरी – निराकार-सगुण रूपाची. हा श्रीकृष्ण भेटतो, तो विश्वरूपदर्शनाच्या वेळी. तिसरी पातळी – निराकार-निर्गुण रूपाची. हा श्रीकृष्ण म्हणजे सनातन, अव्यक्त, उत्तम पुरुष. या रूपाचे वर्णन स्वत: श्रीकृष्णांनीच नवव्या अध्यायात केले आहे.

या तीन रूपांमधील पहिले हे अर्जुनाच्या सरावाचे व आवडीचे आहे. म्हणूनच विश्वरूपात श्रीकृष्णाला पाहिल्यानंतर तो म्हणतो,

*तें साकार कृष्णरुपडें। वांचूनि पाहों आन नावडे।*
*तें नेदखतां थोडें। मानितातित हे।। (११.५९७)*

विश्वरूप पाहिल्यानंतरही अर्जुनाला ओढ लागली आहे, ती या साकार कृष्णरूपड्याची – कारण याच रूपावर प्रेम करता येते.

श्रीकृष्णही अर्जुनापासून आपले वेगळेपण राखून होता, तो हे प्रेमसुख अनुभवण्यासाठीच. ज्ञानदेवांचे श्रीकृष्ण म्हणतात,

*'विपायें अहंभाओ येयाचा जाइल। मिं तें चि जरि हा होईल।*
*तरि काइ कीजैल। एकलेयां।। (६.११६)*

'जर एखादेवेळी (वेगळेपणाचा) याचा अहंभाव लोपला व मी तोच झाला, तर मी एकटा काय करणार?'

श्रीकृष्णाचे अर्जुनावरील हे प्रेम कसे होते? ज्ञानदेव याच अध्यायात पुढे सांगतात,

*हें असो वयसेचिये सेवटीं। जैसें येक चि विये वांझौटी।*
*मग ते मोहाची तुगुटी। नाचों लागे।। (६.१२१)*

श्रीकृष्णाची ही भक्तावर प्रेम करणारी प्रतिमा ज्ञानदेवांनी श्रोत्यांच्या मनातील परिचित प्रतिमेच्या आधारे अधिक ठळक केली आहे. दहाव्या अध्यायात श्रीकृष्णांनी आपल्या विभूती सांगताना म्हटले आहे :

*वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पाण्डवानां धनंजयः। (गीता १०.३७)*

यावर भाष्य करताना ज्ञानदेव भागवतातील अवघे श्रीकृष्णचरित्रच थोडक्यात आणतात. (ज्ञानदेवी १०.२६५ ते २६९). उपर्युक्त पंक्तीच्या उत्तरार्धाच्या स्पष्टीकरणार्थ ज्ञानदेवीच्या सांप्रदायिक प्रतीत येणारी एक अधिक ओवी अशी आहे:

*संन्यासी तुवां होऊनि जनीं। चोरुनि नेली माझी भगिनी।*
*तऱ्ही विकल्पु नुपजे मनीं। मी तूं दोन्ही स्वरूप एक।। (दांडेकर प्रत १०.२९४)*

येथे श्रीकृष्णांनी देवभक्तांच्या ऐक्यावर दिलेला भर महत्त्वाचा आहे. अर्जुन याच पातळीवर शेवटी येतो. मोहग्रस्ततेपासून मोहमुक्तीपर्यंतचा त्याचा प्रवास आपण लक्षात घेतला आहेच. (पाहा परि.४)

एका दृष्टीने अर्जुनाच्या व्यक्तित्वविकासाचा हा आलेख आहे. शेवटी हा कोणत्या पातळीवर येतो? ज्ञानदेव सांगतात,

(अर्जुन म्हणतो)

*जें मज तुम्हां आड। होतें भेदाचें कवाड।*
*तें फेडूनि केलें सुआड। तुवां जी देवा।।*

*तरि आतां तूझी आज्ञा। सकळदेवराज्ञा।*
*करीन देइं अनुज्ञा। भलेतिये विषीं।।* (१८.१५५८-१५५९)

देव व भक्त यांमधील भेद संपला; अभेदाचा मार्ग सुगम झाला. आता श्रीकृष्णाने कोणतीही आज्ञा केली, तरी अर्जुन ती अमलात आणणारच. कारण आता आज्ञा करणारा व ऐकणारा वेगळे राहिले आहेत कोठे?

या ऐक्यभावामुळे श्रीकृष्णही आनंदित झाले व संजयही हरखून गेला. ज्ञानदेव सांगतात,

*उणेनि उमचला सुधाकरू। देखौनि आपुला कुमरु।*
*मर्यादा क्षीरसागरू। विसरे चि ना।।*
*ऐसें संवादाचा बाऊलां। लग्न दोघांचेयां आंतुलां।*
*लागलें देखौनि जाला। निर्भरू संजयो।।* (१८.१५६१-६२)

चंद्र हा समुद्राचा मुलगा. तो जेव्हा कलाविषयक उणेपणाला मुकतो, म्हणजे कलांनी पूर्ण प्रकाशतो, तेव्हा समुद्रात प्रेमाचे भरते येतेच ना? अर्जुनाची भेदबुद्धी लोपली; तो पूर्णपणे अहंमुक्त झाला. त्यामुळे श्रीकृष्णही त्याला चोहों हाती भेटायला येतो. या दोघांचे हे हृदयांचे लग्न लागलेले पाहून संजयही हर्षाने वेडा होतो.

अहंमुक्त आत्म्याचे परमात्मतत्त्वामध्ये विलीन होणे हा गीतेचा कथार्थ या व्यक्तिचित्रणातून मुखरित होतो.

**(७-१.५) संजय व धृतराष्ट्र :** श्रीकृष्ण व अर्जुन यांचे नाते होते संवादाचे. संजय व धृतराष्ट्र ही जोडी नेमकी याच्या उलट आहे. यांचे नाते विसंवादाचे आहे.

संजय हा या शांतिकथेचा सहृदय श्रोता आहे; धृतराष्ट्र हा या रसाचा आस्वाद घेऊ न शकणारा हतदैव श्रोता आहे. 'निजसुखादि- विवशीभाव' या रसविघ्नाचेच तो प्रतीक आहे.

श्रीकृष्णार्जुनांचा संवाद संजय ऐकतो, त्याचा आनंद अनुभवतो. धृतराष्ट्रही त्याच्या तोंडून तो ऐकतो; परंतु त्याला त्याचा आनंद अनुभवताच येत नाही. कारण तो 'पुत्रस्नेहें मोहितु' आहे. त्याला या अनुभवश्रवणात गोडी नाही. 'माझ्या मुलांनी काय पराक्रम केला?' एवढेच सांगण्यासाठी तो वारंवार संजयाला सुचवितो आहे. नवव्या अध्यायाच्या अखेरीस ज्ञानदेव म्हणतात,

*अहो आइकत असा अवधारा। तवं एया बोला निवातु म्हातारा।*
*जैसी म्हैसी नुठी कां पुरा। तैसा उगला चि असे।।*
*तेथें संजयें माथा तूकिला। आहा अमृताचा पाऊसु वरिषला।*

*हा एथ चि असतु गेला। सेजेया गावां।। (१.५१७-१८)*

म्हैस जशी एकदा बसली, की ढिम्म उठत नाही; तसा धृतराष्ट्र नुस्ता अविचलपणे बसून होता. म्हणून संजय म्हणतो, 'अहो, अमृताचा पाऊस पडला; पण हा येथे असतानाही शेजारच्या गावी गेला होता.'

या दोन व्यक्तिप्रतिमा ठळक करण्यासाठी ज्ञानदेवांनी सहाव्या अध्यायाच्या आरंभी एक प्रसंग चितारला आहे.

संजय म्हणतो, 'राजा, श्रीकृष्णाने येथे अर्जुनासाठी ब्रह्मरसाची मोठी मेजवानीच दिली आहे. आपण दोघेही येथे आयत्या वेळी आलो आहोत. परंतु आपल्यालाही ते मूलतत्त्व आयतेच गवसते आहे.' (६. २ ते ४)

पण यावर धृतराष्ट्र म्हणतो, 'संजया, हे मी तुला विचारलेले नाही.' धृतराष्ट्राचे हे बौद्धिक अंधत्वही लक्षात आल्यानंतर संजय काय म्हणतो? ज्ञानदेव सांगतात,

*तेया संजया येणें बोलें। रायाचें हृदय चोजवलें।*
*जें अवसरीं आहे घेतलें। कुमारांचिया।।*
*हें जाणौनि मनीं हांसिला। म्हणे म्हातारा मोहें नासिला।*
*यऱ्हविं बोलु तरि भला जाला। अवसरिचा।। (६.५-६)*

धृतराष्ट्राच्या उद्‌गारांमुळे संजयाला त्याचे मन कळून आले. मुलांवरील प्रेमाच्या बाधेने हा पछाडला आहे, हे त्याच्या लक्षात आले. तो मनातल्या मनात हसून म्हणतो, 'या म्हाताऱ्याचा पुत्रमोहामुळे पुरा नाश झाला आहे. नाही तर, एरव्ही या वेळचे हे श्रीकृष्णाचे बोलणे किती अप्रतिम आहे!'

ज्ञानदेव म्हणतात, 'कैवल्यरसाने भरलेली ताटे येथे वाढली आहेत; परंतु आत्मप्रकाशाची ठाणदिवी करून, इंद्रिये बाजूला ठेवून जो जेवील, त्यालाच हा रस प्राप्त होईल.' (६.२२-२३)

हे धृतराष्ट्राला शक्य नव्हते. इंद्रियविषयांच्या आसक्तीने त्याच्या मनी आधीच ठाण मांडले होते. तेथे आत्मज्ञानाचे बिऱ्हाड कसे थाटणार? 'बीढारावारि काइ बीढार असे?' (दृष्टान्त पाठ क्र.२५)

तुकारामांचा एक अभंग आहे. ते हाडाचे व्यापारी. म्हणून ते एकदा 'देव' विकण्यासाठी दारोदार हिंडत होते. ते म्हणतात,

*देव घ्या कोणी देव घ्या कोणी।*
*आइता आला घर पुसोनी।।*
*देव न लगे देव न लगे।*

*सांठवणेचे रुधले जागे।। (शासकीय गाथा १००९)*

तुकाराम 'देव' आयता घरी घेऊन आले होते. पण कुणी घेण्यास तयारच होईना. कारण त्यांच्या घरात देव ठेवायला जागाच नव्हती. साठवणीच्या साऱ्या जागा प्रपंचविषयांनी भरून गेल्या होत्या.

धृतराष्ट्राच्या बाबतीत असाच प्रकार होता. म्हणूनच तो या रसास्वादाला मुकला.

संजय आणि धृतराष्ट्र अशा या दोन व्यक्ती प्रतिमांकित करून ज्ञानदेवांनी जणू असे सुचविले आहे, की प्रस्तुत ग्रंथाच्या आस्वादासाठीही संजयवृत्ती हवी, धृतराष्ट्राची अंधवृत्ती नको. कारण संजयवृत्ती ही खरी 'निर्मम' वृत्ती आहे. म्हणूनच संजयाला श्रीकृष्णार्जुनांचा संवाद ऐकल्यानंतर अपूर्व आनंदाचा अनुभव आला. तो म्हणतो,

*देखौनि चमत्कारू। कीजे तो नाहिं पैसारु।*
*भजै सकट हा पुरु। नेंत असे।।*
*ऐसा श्रीकृष्णार्जुन। संवादसंगमिं स्नान।*
*करूनि देतसे दान। अहंतेचें।। (१८.१५९९.१६००)*

या अपूर्व आनंदानुभवाचा लोंढा इतक्या वेगाने अंगावर आला, की त्याविषयी विस्मय करण्यासही अवसर उरला नाही; आणि असा विस्मय करण्यास संजय वेगळा उरलाच कुठे होता? श्रीकृष्णार्जुनांच्या त्या संवादसंगमावर स्नान करून आपल्या देहाभिमानाचे दान त्याने देऊन टाकले होते.

**७.२) अवकाशव्यक्ती :** ज्ञानदेवीत अवकाशघटनांप्रमाणेच अवकाश- व्यक्तीही भेटतात. स्वकालीन समाजामध्ये बोकाळलेल्या असत् प्रवृत्ती रेखण्यासाठी ज्ञानदेव या व्यक्तींची चित्रे रेखाटतात.

या संदर्भात समजुतीपुरते फक्त एकच उदाहरण पाहू.

तेराव्या अध्यायात ज्ञानलक्षणे येतात. ती एकत्र केल्यानंतर मूळ गीतेत, 'अज्ञानं यदतोऽन्यथा' एवढेच शब्द येतात. यावर भाष्य करताना ज्ञानदेव मूळ ज्ञानलक्षणांची विरुद्ध बाजू तपशीलवार रंगवितात. अशा या 'अज्ञानी' माणसांची त्यांनी रेखलेली चित्रे ही कविकालीन अवकाशाचे भान देणारी असल्यामुळे त्यांना 'अवकाशव्यक्ती' असे म्हणण्यास हरकत नसावी.

येथे आलेले 'अज्ञानी भक्तां'चे चित्र असे आहे. ज्ञानदेवांचे श्रीकृष्ण म्हणतात, 'एखादा कुळवाडी ज्याप्रमाणे मशागतीची शेतजमीन बदलत असतो, तसा हा अज्ञानी भक्त एका देवाची स्थापना करतो व दुसरा मिळाला, की पहिल्याची पायरी करतो. तो पूजितो माझी प्रतिमा; पण तीही कुठे तरी सांदीकोपऱ्यात बसवून अन्य देवतांच्या यात्रांसाठी निघून जातो. हा घरात स्थापना करील माझी, पण पितृकार्याच्या वेळी याचे

पितर हेच देव. एकादशीच्या दिवशी हा आमचा; तर नागपंचमीला नागांचा. चतुर्थीला हा गणपतीचा; तर चतुर्दशीला दुर्गेचा.

नवमीला हा स्थापना करणार नवचंडीची व रविवार आला, की भैरवाला नैवेद्य दाखविणार. पाठोपाठ सोमवार आला, की बेल घेऊन हा शंकराकडे धाव घेणार. असा हा एकटाच सर्व देवांची सरबराई करणारा भक्त कसा आहे? तर –

*अखंड भजन करी। उगा न राहे क्षणभरी।*
*आघवेनि गांवंदारी। ऐहैव जैसी।।* (१३.८२०)

'एखादी वेश्या ज्याप्रमाणे गावची सर्व दारे हिंडते, तसा हा क्षणाचाही विसावा न घेता सारखा कुणा ना कुणा देवाला भजत हिंडत असतो' (१३.८१० ते ८२०)

विविध देवतांच्या पूजांनी गजबजलेला ज्ञानदेवकालीन समाज लक्षात घेतला, की ज्ञानदेवांनी रेखाटलेल्या या अवकाशव्यक्तीचे चित्रण किती मार्मिक आहे, हे सहज कळून येईल.

७.३) **प्रतिमाव्यक्ती :** ज्ञानदेवांचे बोलणे प्रतिमांचे असल्यामुळे प्रतिमाघटनांप्रमाणे प्रतिमाव्यक्तीही येथे अनेक प्रकारच्या भेटतात. त्यामध्येही जेव्हा उपमेय स्थानी असणाऱ्या विविध विषयांसाठी एकच व्यक्ती येते, तेव्हा तिच्या व्यक्तित्वाचे बदलते पैलू एखाद्या झुंबरासारखे डोळयांसमोर चमकू लागतात.

समजुतीसाठी अशी एक व्यक्ती घेऊ : 'माउली'.

ही प्रतिमा विविध स्तरांवरील दहा प्रस्तुतांसाठी ज्ञानदेवीत आला आहे.

ज्ञानदेवांचे **गुरू** निवृत्तिनाथ ही त्यांची माउली. कशी आहे ही? तर

*सतरावियेचे स्तन्य देसी। अनाहताचा हल्लरु गासी।*
*समाधिबोधें निजविसी । बुझाऊनि।।* (१२.७)

ज्ञानदेव **श्रोत्यांनाही** माउली म्हणतात. कारण बालकाच्या बोबड्या बोलांचे आई जसे कौतुक करते, तसे हे श्रोते ज्ञानदेवांचे सदोष विवरणही गोड मानून घेतात. (९.६.७) हा वक्ता जरी एखादे वेळी काही अधिकउणे बोलला, तरी त्यामुळे त्यांचे प्रेम उणावत नाही; उलट, ते दुणावते. कारण -

*आहो तान्हेयांची लागे झटे। तरि तेणें अधिकें चि पान्हा फूटे।*
*रोसें प्रेम दूणावटे। पढियंतेयाचे नि।।* (९.१८)

**श्रीकृष्ण** ही देखील अर्जुनाचे लाड करणारी वात्सल्यवेडी आईच आहे. कसे आहे हिचे मुलाविषयीचे वेड? तर –

*देखां कामधेनु ऐसी माये। सदैवां जेया होये।*
*तो चंद्रु चि परि लाहे। खेलावेया।। (५.१०)*

ही आई तर कामधेनूच; आकाशीचा चंद्रदेखील ती या मुलाला खेळण्यासाठी आणून देईल.

ज्ञानदेव **व्यासांनाही** 'माउली' म्हणतात. कारण श्रीकृष्णार्जुनांचा अवघे आकाश व्यापून उरणारा मोकळा सुखसंवाद त्यांनी गीतेच्या सातशे श्लोकांत बसविला, म्हणून तर तो तुमच्या आमच्यासारख्या बालकांना सहज तोंडात घेता आला :

*बालकांतें वोरसें। माये जेवऊं बैसे।*
*तेव्हलिं तेया ठाकति तैसें। घांस करी।।*
*तैसें शब्दें जें न लभे। ते घडूनु अनुष्टुभें*
*स्त्रीशूद्रादिप्रतिभे। सामाविलें।। (१८.१६७६ व १६७८)*

या व्यासमाउलीने सांगितलेली **गीता** ही देखील माउलीच; कारण लहान-मोठे असा भेदभाव न करता ती सर्व पाठकांना सारखेच फळ देते :

*गीतापाठकासि ऐसें । फल अर्थज्ञाना चि सरिसें।*
*गीतामाऊलीसि नसे। जानेंतानें।। (१८.१५१८)*

'तस्मात् शास्त्रं प्रमाणं ते' (१६.२४) यावर भाष्य करताना **वेद-श्रुती** यांनाही ज्ञानदेव माऊली म्हणतात :

*पैं अहिता पासौनि काढिती। हित देऊनि वाढविती।*
*नाहिं श्रुती परौती। माऊली जगा।। (१६.४५९)*

ही श्रुतिमाऊली जगाला अकल्याणापासून वाचविते व कल्याणाचा मार्ग दाखविते.

ज्ञानदेवांची **स्वधर्माचरणाचे** महत्त्व विशद करताना त्यालाही 'माए' म्हटले आहे. गीता सांगते, 'स्वधर्म जरी गुणहीन असला, तरी परधर्माहून तो अधिक हितकर आहे.' (१८.४७)

अशा स्वधर्माविषयी ज्ञानदेव म्हणतात :

*आणि आपुली माए। कुब्ज जऱ्हीं आहे।*
*तऱ्हीं जीणें जीजे तें नोहे। स्नेह कुऱ्हैं कीं।। (१८.९२३)*





अनुक्रमणिका

आपली आई कुबडी असली, तरी तिचे प्रेम तर कुबडे नाही ना?

या स्वधर्माचे आचरण करताना जे कर्म केले जाते, तेही आसक्ती सोडून केवळ कर्तव्यभावनेने करावयाचे असते, म्हणूनच या **'कर्मा'** ला ज्ञानदेव 'माता'च म्हणतात :

*पैं अवज्ञा आणि कामना। मातेचां ठाइं अर्जुना।*
*केलीं दोन्हीं पतना। हेतु होंति॥ (१८.२०२)*

दैवी संपत्तीमधील **'सत्या'** ची महती सांगताना ज्ञानदेव म्हणतात,

*परि अहितिं कोपौनि सोफ। लालनीं मौ जैसें पुष्प।*
*तिये मातेचें स्वरूप। जैसें होये॥ (१६.१२२)*

मूल चुकत असेल, तर आई रागावते, लाड करताना मात्र ती फुलासारखी कोमल बनते. 'सत्य' हे असेच असते.

–आणि शेवटी ज्ञानदेवांनी **आत्म्यालाही** माऊली म्हटले आहे. कुठे भेटते ही?

काम, क्रोध, लोभ यांना बाजूला सारावे; सत्संगती धरावी. मग गुरुकृपेच्या नगरी जावे. तेथे ही माऊली नक्की भेटते.

*तेव्हां आत्मानंदें आघवे। जे सदा वसतें बरवें।*
*तें तैसें चि पाटण पावे। गुरुकृपेचें॥*
*तेथ प्रियाची पैली सीमा। ते भेटे माऊली आत्मा।*
*तिये क्षेवीं आटे डिंडिमा। संसारिक हे॥ (१६.४३९-४४०)*

अशा या दशरूपांतून 'माउली' ही व्यक्तिप्रतिमा उभी करणाऱ्या ज्ञानदेवांना सर्व संतांनी नंतर 'माऊली' म्हटले, ते योग्यच म्हणायला हवे.

८) **'ज्ञपूर्झा'संमित कथन :** शेवटी ज्ञानदेवांच्या कथनरीतीचा एक महत्त्वाचा विशेष नोंदायला हवा.

ज्ञानदेवीत प्रतिमाघटना व प्रतिमाव्यक्तीही इतक्या बहुविध का?

या प्रश्नाच्या उत्तरासाठी ज्ञानदेवीच्या समारोपातील त्यांचे म्हणणे थोडे लक्षपूर्वक ऐकायला हवे.

ते म्हणतात,

*आणि कृष्णार्जुनिं मोकली। गोठि केली निराळीं।*
*ते व्यासें दाविली करतलीं। घेओं ये ऐसी॥ (१८.१६७५)*

येथील 'निराली' हा शब्द महत्त्वाचा आहे. श्रीकृष्णार्जुनांचा संवाद मनमोकळा होता; तो या 'निराली' म्हणजे निरालंब आकाशामध्ये भरून राहिला होता. व्यासांनी त्याला शब्दबद्ध केला. हे व्यासांच्या प्रतिभेचे कौतुक.

असेच कौतुक ज्ञानदेवांच्या प्रतिभेचेही खुद्द गुरू निवृत्तिनाथांनी केले आहे.

प्रसंग आहे पाचव्या अध्यायातील. ज्ञानी संतांचे वर्णन करता करता ज्ञानदेवांच्या वाणीला भरते येते. तेव्हा निवृत्तिनाथ म्हणतात,

*'तूं संतस्तवनीं रचसी। तरि कथेची से न करिसि।*
*किर निरालीं बोल देखसी। सनागर.. (५.१४०)*

तू एकदा संतांचे गोडवे गाण्यात रंगून गेलास, की मूळ कथासूत्र विसरतोस. कारण, निरालंब आकाशामध्ये तुला खरोखर चित्तवेधक बोल दिसत असतात.'

व्यासांचा मागोवा घेत घेत ज्ञानदेवांनी निरालंब आकाशातील तो मोकळा श्रीकृष्णार्जुन संवाद ऐकला. कुठे शून्यामध्ये त्यांना तो दिसला, ऐकू आला. म्हणूनच विविध प्रतिमांतून त्यांनी त्याचे 'रूपकरण' केले.

कविप्रतिभेचे हेच तर वैशिष्ट्य असते ना? केशवसुत म्हणतात,

*ज्ञानाच्या कुंपणावरून,*
*धीरत्व धरून,*
*उड्डाण करून,*
*चिद्‌घनचपला ही जाते,*
*नाचत तेथें चकचकते;*
*अंधुक आकृति तिस दिसती,*
*त्या गाताती*
*निगूढ गीती;*
*त्या गीतीचे ध्वनि निघती-*
*झपूर्झा ! गडे झपूर्झा! (झपूर्झा क्र. ३)*

ज्ञानदेवांचे कथन असेच 'झपूर्झा' संमित आहे, असे म्हटले, तर ते वावगे ठरू नये.

**संदर्भ निर्देश :-**

प्रस्तुत लेख पुणे विद्यापीठ मराठी विभाग आणि गीता धर्म मंडळ, पुणे ३०, यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित कै. डॉ. रघुनाथराव राक्षे व्याख्यानमालेत ता. २३ मार्च, १९९५ रोजी दिलेल्या दुसऱ्या व्याख्यानावर आधारित आहे.

या व्याख्यानमालेतील पहिल्या व्याख्यानावर आधारित लेख 'भाषा आणि जीवन' चा अंक १३.२, उन्हाळा, १९९५ या अंकात प्रसिद्ध झालेला आहे.

या लेखातील संदर्भ संकेतांचा खुलासा :

**आचा.** : 'ज्ञानमयूरांची कविता' मा.ना.आचार्य (१९९३)

**दृष्टान्तपाठ** : केशिराज संकलित 'दृष्टान्तपाठ' संपादक शं.गो. तुळपुळे व कुमुदिनी घारपुरे (१९६६)

**धोंड** : 'ज्ञानेश्वरीतील लौकिक सृष्टी' म.वा.धोंड (१९९१)

**ढेरे** : 'श्री ज्ञानेश्वर- विविध दर्शन' संपादक - वि.त्र्यं. शेटे व रा. चिं. ढेरे (१९७५) या ग्रंथातील रा. चिं. ढेरे यांचा लेख.

**पू.** : पूर्वोक्त. निकटचा पूर्वोक्त संदर्भ.

**संको.** : भारतीय संस्कृतिकोश. संपादक पं. महादेवशास्त्री जोशी. (खंड १) (दु. आ. १९८२)

**ज्ञानदेवी** : राजवाडे प्रतसंहिता. संपादक- अरविंद मंगरूळकर, वि. मो. केळकर, मुंबई विद्यापीठ मराठी विभाग प्रकाशन (१९९४).

**मु. पोस्ट चौल, ता. अलिबाग, जि. रायगड, ४०२२०३.**

□□

---

**सरकारी भाषांतराचा (आणखीन एक) नमुना :**

"गेली चार वर्षे भाषांतरानं एका अभूतपूर्व अशा आर्थिक आणि औद्योगिक सुधारणा कार्यक्रमाला सुरवात केली आहे. भारतीयांना त्यांची गरज, रोगराई, आणि अज्ञानापासून मुक्ती मिळवून देण्याचा त्याचा उद्देश आहे. सांरचनिक समायोजनेच्या पलीकडचं हे धोरण आहे आणि आर्थिक संकाटाचं मूळ कारण दूर करण्यासाठी तसंच प्रातिनिधिक कामकाजपद्दतीच्या एका विशाल दृष्टीकोनात तळागाळापासून लोकांचा जास्तीतजास्त सहभाग करण्यासाठी ते कार्यरत राहिल."





अनुक्रमणिका

# अर्थव्यक्ती, अर्थपूर्णत्व आणि भाषाशिक्षकाचे प्रश्न

शैलेश सदाशिव पुंडलिक

भाषावैज्ञानिकांच्या निकषांनुसार भाषा यदृच्छास्वभाव, समाजसापेक्ष आणि सामाजिक ऐकमत्यानुसारी असते[1]. भाषाव्यवहाराला अनुभूतिमूलक मानावे, की ऐकमत्यमूलक मानावे (किंवा अन्य काही पर्याय मूलक मानावे), यावर बराच खल होऊन त्यांचा परामर्शही घेण्यात आलेला आहे.[2] अनुभूती साक्षात, अप्रतिहत, अनिरुद्ध आणि निरालंब आणि काव्यात्म भाषेत जिवंत 'रसरशीत' असल्यामुळे ती स्वतः प्रमाण आहे, असे म्हणता येऊ शकेल. त्यामुळे भाषाव्यवहाराची अनुभूतिमूलकता हा निसर्गतःच आकर्षक आणि वांछनीय निकष वाटतो. ऐकमत्याचा मुद्दा हा नेहमीच विवादास्पद आहे. दोन संभाषकांचे एखाद्या वागैककाच्या (speech unit) अर्थाबावत असणारे ऐकमत्य अनेक वेळा मतभेदाचा आणि वादाचा विषय आहे. ज्या रंगाला मी 'काळा' म्हणतो, तो काहींच्या मते 'राखाडी' किंवा 'चॉकलेटी ' असू शकतो. ऐकमत्य यदृच्छास्वरूप, स्थल-काल-सापेक्ष आणि भिन्नप्रमाणपूर्ण (In different degrees) असते. त्यामुळे ते एकतर परतःप्रमाण होईल, म्हणजे ते खरोखरच तसे आहे, की नाही, यासाठी अनुभूतीचा आधार घ्यावा लागेल; किंवा त्यासाठी दुसऱ्या ऐकमत्याचा आधार घ्यावा लागेल आणि या दोन्ही आपत्तींतून सुटका करून घेण्यासाठी ते स्वतःप्रमाण मानले, तर त्याच्या ईप्सित स्वरूपालाच बाधा येते.[3] आल्स्टन यांनी म्हटल्याप्रमाणे आपण एखादे भाषिक एकक एका अर्थाने वापरतो आहोत, ते खरे, पण दुसरे भाषिक त्याच अर्थाने ते एकक वापरतात, हे कसे ठरविणार? आपण त्या एककाची / अभिव्यक्तकाची व्याख्या करू शकतो, हेही खरे; पण त्या व्याख्येतील (इतर) शब्द तरी आपण सर्वच ऐकमत्याने आणि ठराविक अर्थांनीच वापरतो, हे तरी कसे ठरविणार? म्हणजे ऐकमत्य ठरविण्यासाठी उपयोजिलेल्या ऐकमत्यावरही स्वपृष्ठीकरणाचा आरोप येईल.[4]

उपरिनिर्दिष्ट कारणांमुळे भाषार्थाचे अनुभूतिमूलकत्व अतिशय आकर्षक वाटते, यात शंका नाही. अर्थ आणि अनुभूती यांच्या परस्परसंबंधांवर ज्ञानविज्ञान (epistemology), वस्तुतत्त्वशास्त्र (ontology) आणि तर्कशास्त्र यांच्या आधारे जे आक्षेप घेतले जातात, त्यांची काही तरी समाधानकारक व्यवस्था लावता येईल; निदान तसे वाटते तरी; पण त्यासंबंधीच्या भाषावैज्ञानिक त्रुटी इतक्या सहजासहजी काही



अनुक्रमणिका

समाधानकारक व्यवस्थेत बसविता येऊ शकतील, असे मानणे अवघड आहे. उदा., आल्स्टन यांनी असे दाखविले, की 'आणि', 'परंतु', 'तथापि' यांसारख्या शब्दांचे अर्थ अनुभूतीवर आधारलेले असणे बरोबर वाटत नाही. तसेच, John hit Jim, Jim hit John, John did not hit Jim, Did John hit Jim? वगैरेंसारख्या वाक्यांत John आणि Jim तसेच did आणि did not या शब्दांचे जे व्याकरणिक अर्थ आहेत, ते अनुभूतिक्षमतेच्या आवाक्यात येतात, असे म्हणणे अवघड आहे.[५]

व्याकरणिक अर्थांच्या या शृंगापत्तीतून सुटका करून घेण्यासाठी रसेल यांनी असा प्रस्ताव मांडला, की (वागृव्यवहाराचे) शब्द हे एकक न मानता वाक्य हे एकक मानावे आणि वाक्यातील शब्दांचा किंवा, खरे म्हणजे, वाक्याचा अर्थ एकसमुच्चयाने, एकसमयी असा होतो, असे गृहीत धरले, तर त्या परिस्थितीच्या आणि तदनुरूप वाक्यांच्या परस्परसंबधांतून व्याकरणिक अर्थ सुद्धा ज्ञात होतील.[६]

रसेल यांच्या प्रतिपादनानुसार 'हा लाल चेंडू आहे' किंवा 'हे पुस्तक निळे आहे' यांसारखी अनुरूप वाक्ये ही निरीक्षण-वाक्ये (observation sentences) आहेत. अशा वाक्यांच्या रचनेतच सर्व प्रकारच्या व्याकरणिक रचना, साह्यकारी क्रियापदे आणि इतर व्याकरणिक अर्थांची एकके मूलतःच उपलब्ध होतात. त्यामुळे ही वाक्ये अनुभवान्ती समजल्यावर and, but, nevertheless वगैरेंसारख्या शब्दांचे अर्थ ज्ञात होतातच. आता ही एकके वापरून अन्य मोठी एकके बनविता येतात, की नाही; किंवा ही एकके त्यांच्या मूलघटकरूप अशा छोट्या एककात विश्लेषित करता येतात, की नाही, हा खरा वादाचा मुद्दा आहे.

रसेल हे तत्त्वज्ञ असल्यामुळे त्यांनी वाक्यव्यवहाराच्या शृंगापत्तीतून जी स्वतःची सुटका करून घेतली, तीत बऱ्याच कारणांनी तथ्य आहे, हे खरे आहे, ज्ञाननिष्पत्तीच्या क्रियेत सर्ग पावणारे ज्ञान हे नेहमीच एका मर्यादित अर्थाने, मर्यादित स्वरूपात एखाद्या संपूर्णाचे (whole) समग्र आणि एकसमयी असेच असते. त्या संपृक्त (complex) संपूर्णाचे आपण नंतर विश्लेषण करतो, हा भाग वेगळा. मानसी भाषाविज्ञानातही (psycholinguistics) असे आढळते, की प्रथम भाषा म्हणजे भा१ किंवा L1 आत्मसात करणारी बालके भाषाव्यवहाराचे आकलन करून घेताना ते वाक्य याच एककाच्या स्वरूपात करून घेतात, असे म्हणता येईल; कारण त्यांचा भाषाव्यवहार सुद्धा वाक्य याच एककात होतो; आणि प्रौढ भाषेचे ज्याप्रमाणे व्याकरणाचे नियम असतात; त्याचप्रमाणे त्यांच्या वेगळ्याच व्याकरणांचे नियम असतात.[७] फक्त प्रौढांच्या व्याकरणाच्या समकक्ष होण्यासाठी त्यात अनेक बदल घडत घडत वयाच्या जास्तीत जास्त पाचव्या /सहाव्या वर्षी त्यांचे व्याकरण सुसंबद्ध सुघड, आणि बहुतेक, निरपवाद होते. या व्याकरणात पुढे फारसे फेरफार होताना आढळत नाहीत. मात्र त्यांची शब्दसंपत्ती कायमच फेरफार दाखवत असते. आय्. ए. रिचर्ड्स या प्रख्यात समीक्षकानेही काही वेगळ्या संदर्भात असे प्रतिपादन केलेले आहे, की शब्दांच्या

अर्थांची गोळाबेरीज म्हणजे वाक्याचा अर्थ, असे म्हणता येत नाही, तर कित्येक वेळा वाक्यातील संघटनेनुसारच शब्दांचे अर्थ ठरवावे लागतात; आणि शब्दकोशाचे शास्त्रज्ञ त्यांच्या शब्दाच्या अर्थाचे जे निश्चितीकरण करतात, त्या प्रक्रियेत त्यांना त्या शब्दाचे अनेक भिन्नक्षेत्रीय वाक्यांमधील त्या शब्दाच्या स्थानाचा विचार करावा लागतो. शब्दकोशातही त्यांचा निर्देश करावा लागतो.[८] याप्रमाणे मानसी भाषाविज्ञान, ज्ञानविज्ञान, अर्थविज्ञान, शब्दकोशशास्त्र या अनेक पातळयांवर रसेल यांची ही (Logical atomism) ची उपपत्ती अतिशय आकर्षक वाटते. भाषाशिक्षकाला मात्र वर्गातील वस्तुस्थितीला सामोरे जायचे असल्याने त्याचे काही मुद्दे मांडणे आवश्यक आहे.

एकदा वाक्य हे एकक आहे, असे मानायचे ठरले, तर त्यापेक्षा छोट्या एककात त्याचे विश्लेषण होऊ शकत नाही, पण तसे म्हटले, तर शब्दपातळीवरच्या एककांचे काय होणार, हा प्रश्नच आहे. त्याबाबतीत शब्द हे सुद्धा एक वाक्यच मानावे, अशी भूमिका घेता येते. उदा., what did you eat? यासारख्या प्रश्नाला Mango या एकाच शब्दाने (किंवा वाक्याने) उत्तर देता येते. याखेरीज He is good, isn't he? अशा प्रश्नाला Yes, of course, Is he? वगैरेंसारख्या शब्दांनी किंवा शब्दसमूहांनी उत्तर देता येते. त्यांना सुद्धा वाक्य हीच संज्ञा द्यावी, की वाक्यखंड ही संज्ञा द्यावी, असा प्रश्न उद्‌भवतो. पण ते क्षुल्लक आणि नामांतरात्मक (notational) मानता येईल.[९] प्रत्यक्षात वाक्य हे एकक मानले, तर इतर एककांप्रमाणे तेही व्यक्तिनिष्ठ स्वरूपात शिकावे लागेल. कारण ते एकमेव (unique) व्यक्तिगत (individual) आणि अपरावर्तनीय (nontransferrable आणि non changeable) होते. याचा अर्थ असा होईल, की भाषेतील सर्व वाक्ये ही व्यक्तिगत स्वरूपातच (logical atoms) शिकावी लागतील. कारण एका वाक्याच्या घडणीचे नियम दुसऱ्या वाक्याच्या घडणीसाठी वापरता येणार नाहीत. प्रत्यक्षात तर असे आढळते, की कुणीही भाषक अक्षरशः किंवा शब्दशः नवनवी अशी अनंत वाक्ये तयार करू शकतो[१०] आणि ती वापरू शकतो. आता ही सर्वच वाक्ये तो प्रत्यक्षात कधी तरी शिकलेला आहे, असे म्हटले, की जे प्रत्यक्षात शक्य नाही, तरी त्याला आवश्यक असणारा अनंत कालावधी त्याला कुठे उपलब्ध होतो? बरे, त्याला ही वाक्ये जन्मतःच उपलब्ध होती (म्हणून ती शिकण्याचा प्रश्न उद्‌भवत नाही), असे म्हटले, तर तो भाषा शिकतो, म्हणजे नेमके काय करतो, असा काहीसा उत्तर देण्यास अशक्य होणारा प्रश्न उद्‌भवतो.

बरे, दुसऱ्या बाजूने पाहिले, तर He is good या वाक्यावरही मी Is he? असा प्रश्न विचारू शकतो आणि He is brave या वाक्यावरही Is he? असा प्रश्न विचारू शकतो. याप्रमाणे अनंत परींनी उपलब्ध होणाऱ्या वाक्यांना मी हाच प्रश्न विचारू शकतो. अशा वेळी एका प्रश्नातील Is he? आणि दुसऱ्या प्रश्नातील Is he ही वाक्ये एकाच एककाची दोन रूपे आहेत, की ती प्रत्यक्षात दोन भिन्न एकके

आहेत? म्हणजे एकाच स्वरूपात अनंत एकके उपलब्ध होतात, असे म्हणता येईल का? ती भिन्न एकके नसतील, तर ती एकाच स्वरूपात का वापरता येतात? त्यापुढे जाऊन असेही विचारता येईल, की ही सर्व एकके अपूर्वसृष्ट (not already created / born) अशी आहेत, का नाही? ती अपूर्वसृष्ट अशी असली, तर दोन संभाषकांना त्यांचा पूर्वी अभ्यास न करता सुद्धा प्रत्यक्ष संभाषणात मात्र ती अतिशय सफाईने वापरता येतात, हा चमत्कारच म्हणावा लागेल. ही सर्व एकके अपूर्वसृष्ट नाहीत, असे म्हटले, तर How are you? Fine, thanks. यांसारखी काही संस्कारित (ritualied) वाक्ये सोडली, तर बाकीची इतर सर्वच अपूर्वसृष्ट असतात, हा प्रत्यक्ष अनुभवच आहे.

बरे, तिसऱ्या बाजूने पाहिले, तर what did you eat? सारख्या प्रश्नाला Mangoes, Mangoes and apples, nothing वगैरेंसारखी अनंत उत्तरे देता येतात. आता वास्तविक एका प्रश्नाला एकच उत्तर अपेक्षित असताना ही मिळू शकणारी उत्तरे म्हणजे एकाच एककाचे अनंत पर्याय मानावे का? त्याचा अर्थ असा होईल, की भाषाव्यवहारात नुसतेच अनंत एकक उपलब्ध होतात, असे नव्हे, तर त्या एककांचे ही एक एकाचे अनंत पर्याय उपलब्ध होतात. एकूणच भाषाशिक्षकाने दुसरा व्यवसाय निवडलेला बरा.

आता रसेल यांच्या साध्यासरळ उपपत्तीचे मी अगदी चुकीचे (किंवा विडंबित सुद्धा) रूप दाखवितो आहे, असा इथे आक्षेप घेता येईल. पण ती उपपत्ती जोपर्यंत केवळ तत्त्वज्ञानाच्या पातळीवर चर्चेला येते आहे आणि भाषाशिक्षकाच्या प्रत्यक्ष अनुभवाची तिला जोड दिली जात नाही, तोपर्यंत येणारे तर्कनिष्ठ निष्कर्ष यापेक्षा फार वेगळे असू शकतील, असे वाटत नाही. त्यामुळे Logical atomism ही उपपत्ती अतिशय आकर्षक आणि कदाचित उपयुक्तही असली, तरी ती सध्याच्या तिच्या स्वरूपात फारशी उपयोगाची नाही, हे स्पष्ट आहे.

**Verifiability Theory**

इसवी सनाच्या तिसऱ्या दशकात मॉरिट्झ श्लिकभोवती जमा झालेल्या तत्त्वज्ञ, शास्त्रज्ञ आणि गणित्यांनी Verifiability Theory of Meaning या नावाची उपपत्ती प्रसृत केली. त्यांना आणि त्यांच्या विचारप्रभावाखालील संशोधकांना Logical Positivists असेही म्हणण्याची पद्धत आहे. त्यांचे प्रमुख उद्दिष्ट शब्दार्थापेक्षा वाक्यार्थाच्या वैधतेसंबंधातील होते. अर्थात त्यामागे शब्दार्थाचा विचार अनुस्यूत होताच. त्यांच्या मते एखादे वाक्य तत्त्वतः सिद्ध/असिद्ध करता येते, की नाही, ही त्या वाक्याच्या अर्थपूर्णत्वाची कसोटी आहे. 'आत्मा अमर आहे' हे वाक्य अर्थपूर्ण होऊ शकत नाही, कारण निरीक्षणासाठी कोणत्या अटी पूर्ण झाल्या, तर हे विधान सिद्ध होऊ शकते, हे आपण स्पष्ट करू शकत नाही. याउलट, 'माझ्या हातात एक लाल फूल आहे' असे म्हटले, तर त्याच्या सिद्धतेसाठी अनेक अटी नमूद करता येतात.

उदा., माझ्या हातात एक फूल हवे, ते पाहण्यासाठी पुरेसा प्रकाश हवा, पाहणारा मनुष्य रंगांधळा, रातांधळा वा नुसताच अंधळा नसावा, त्याची आणि माझी समोरासमोर भेट झालेली असावी. अशा आणि अशा इतर अनेक अटींची पूर्तता झाली, की माझ्या हातातील फुलाचा रंग खरेच लाल आहे, की नाही, हे तो ठरवू शकतो.

लॉजिकल पॉझिटिविझमूच्या तत्त्वज्ञांचा ही वाक्ये प्रत्यक्षात सिद्ध झालेली असायलाच हवी, असा आग्रह नव्हता. उदा., 'नजीकच्या तारकापुंजांवर जीवसृष्टी आहे' यासारखे वाक्य सध्या तरी Verify करता येत नाही, कारण अगदी जवळच्या तारकापुंजांचे (galaxies) आपल्यापासूनचे अंतर सुद्धा काही दशलक्ष प्रकाशवर्षे इतके आहे. तरी ही काही विशिष्ट अटींची पूर्तता झाल्यावर ते विधान सत्य आहे, की असत्य आहे, हे ठरवता येऊ शकेल. त्यामुळे ते अर्थपूर्ण आहे, असे म्हणता येते.

'सॉक्रेटीस हा मर्त्य आहे' यासारखे unverified विधान अर्थपूर्ण आहे. कारण त्यामागे 'सर्व माणसे मर्त्य आहेत', 'सॉक्रेटीस हा माणूस आहे' यांसारखी विधाने आहेत. त्यांचे रूपांतर अनेक छोट्या छोट्या अटस्वरूपी विधानात केले, तर असे आढळते, की ती सुद्धा रसेल यांच्या भाषेत observation sentences आहेत. आल्स्टन यांनी नमूद केल्याप्रमाणे Logical atomism आणि verifiability theory या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत.[१२] त्या वेगवेगळ्या वाटतात, याचे कारण त्या एकाच घटनेकडे परस्परविरुद्ध दिशांनी पाहतात, एवढेच आहे. अर्थात हे खरे नाही, की Logical atomism विरुद्ध मांडलेली मते verifiability theory विरुद्धही मांडता येतील. कारण त्यांची प्रभावक्षेत्रे भिन्न आहेत.

Verifiability theory ही मूलतः सकारात्मक किंवा नकारात्मक विधानांसंबंधीची आहे. ही विधाने सिद्धीकरणाला अनुकूल असतात, हे खरे; पण Did he go home? या प्रश्नासारखे वाक्य कोणत्या अर्थाने Verifiable म्हणता येईल? It is a beautiful child किंवा It is an ugly child ही विधाने (कदाचित) Verifiable आहेत, असे म्हणता येईल.[११] पण what a beautiful child! हे विधान कोणत्या अर्थाने सिद्धीकरणाला मिळू शकेल?

त्यातही तर्कशास्त्रीय विधाने, गणिती विधाने यांना या उपपत्तीने सूट दिलेली आहे. त्रिकोण म्हणजे तीन रेषांनी बद्ध होणारी आकृती किंवा अ = ब आणि ब = क म्हणून अ=क या विधानांना सिद्धीकरणाची गरज नाही. त्यांच्या उद्दिष्टात जे अभिप्रेत आहे, तेच त्यांच्या विधेयातही अभिप्रेत आहे आणि त्या दोहोंत फक्त तादात्म्य स्थापित केले जाते. अशा वाक्यांना इंग्रजीत analytic वाक्ये म्हणतात आणि ती नेहमीच सत्य असतात.

याउलट, 'तो भेकड फार शूर आहे' किंवा 'माझा चश्मा चक्राकार चौकोनी आहे' यांसारखी विधाने नेहमीच असत्य असतात. कारण त्यांची उद्दिष्टे आणि विधेये परस्पर-व्याघातक असतात. Analytic वाक्यांना tautologies असेही म्हणतात, तर या

दुसऱ्या प्रकारच्या वाक्यांना confradictions म्हणतात.

तिसऱ्या प्रकारच्या वाक्यांना synthetic वाक्ये असे म्हणतात. ती मात्र कधी खरी किंवा कधी खोटी असतात. उदा., 'माझे पेन निळे आहे' या विधानाच्या पडताळ्यासाठी ऐंद्रिय अनुभूतीची अपेक्षा असते. अशा विधानांनाच observation sentences किंवा verifiable sentences चा दर्जा प्राप्त होऊ शकतो. 'आत्मा क्षणभंगुर आहे,' पुण्याचे फळ स्वर्गप्राप्ती आहे, वगैरेंसारख्या विधानांना अशा प्रकारे सिद्धता प्राप्त होऊ शकत नाही; पण ती असत्य आहेत, असेही म्हणता येत नाही. लॉजिकल पॉझिटिविझमच्या मते अशा स्वरूपाच्या विधानांना 'अर्थपूर्ण' हे विशेषण लावता येत नाही.[१२]

पण तोच निष्कर्ष लावायचा, तर बहुतेक सर्व काव्य हे 'निरर्थक' ठरेल .

The force that through the green fuse drives
  the flower
Drives my green age; that which blasts the
  roots of trees
Is my destroyer; and I am dumb to tell
  the crooked nose
My youth is bent by the same wintry fever[13]

किंवा

Lady, three white leopards sat under a juniper tree
In the cool of the day, having fed to satiety
On my legs my heart my liver and that which
  had been contained
In the hollow round of my skull[14]

यांसारख्या काव्यपंक्ती निरर्थक आहेत का? त्यांना काही कार्यमूल्य आहे, की नाही? भाषाशिक्षकाने ती वर्गात शिकवावी, की नाही? अगदी 'मी दुःखी आहे', 'मी आनंदी आहे' अशी वाक्ये हसत हसत किंवा रडत रडत म्हणणाऱ्याची विधाने अर्थपूर्ण होतात, की नाही? अशा कोणत्या अटी आहेत, की ज्यांची पूर्तता केली असता ही विधाने पडताळून पाहता येतील?

'मला भूक लागलेली आहे' हे विधान तरी कशाच्या आधारावर पडताळता येईल? सहा महिने हिवाळ्यात झोपणाऱ्या ध्रुवीय अस्वलाला सहा महिने अन्नाची खरेच गरज नसते काय? जोपर्यंत व्यक्ती व्यक्तींच्या भुकेच्या तीव्रतेत फरक पडत राहतो, तोपर्यंत 'मला भूक नाही' आणि 'मला भूक आहे' यांसारखी विधाने सापेक्षच ठरतील. ती कशी पडताळून पाहणार?





अनुक्रमणिका

याच मुद्द्याचे पुढचे स्वरूप म्हणजे संदिग्धता (Vagueness) 'पुणे हे एक मोठे शहर आहे' हे वाक्य बरोबर आहे, की चूक? न्यूयॉर्क, शिकागो, टोकियो यांच्या तुलनेतील पुणे आणि मौजे/बुद्रुक सुंठवाडी, रत्नागिरी यांच्या तुलनेतील पुणे हे छोटे शहर आहे, की मोठे आहे? दुसऱ्या तरी कोणत्या निकषावर पुण्याचा मोठेपणा ठरविणार? ऐतिहासिक महत्त्व? भौगोलिक स्थान, की अन्य काही? त्यामुळे अगदी सकारात्मक किंवा नकारात्मक वाक्यांचे अर्थ सुद्धा ठरविणे अतिशय अवघड आहे. संदिग्धतेच्या या स्वरूपासंबंधी एक वेगळाच लेख लिहिणे आवश्यक असल्याने इथे त्याचे विस्तृत विवेचन करणे अशक्य आहे. पण एकूणच Verifiability theory काय किंवा Logical atomism काय, प्रत्यक्ष भाषाशिक्षणाच्या पातळीवर फारसे उतरत नाहीत, हा मुद्दा लक्षात घेणे आवश्यक आहे.

व्याकरणिक अर्थ हे वस्तुतः इंद्रियगम्य आहेत, की नाहीत, हा वादाचा मुद्दा आहे. वादास्पद नाही, ते हे, की याच प्रकारचे नव्हे, तर इतरही आकलनास अवघड असणाऱ्या संकल्पना प्रथम भाषा शिकणारी लहान मुले सहज (?) आत्मसात करतात.[१५] उदा., १,२,३,४ यांसारख्या नैसर्गिक (natural, cardinal) संख्यांच्या कल्पना आकलनास फार अवघड आहेत. दुसरा, तिसरा, चौथा..... कितवा वगैरे सारख्या ordinal संख्या त्याहूनही अवघड आहेत. पण पाचव्या, सहाव्या वर्षाच्या आतील मुले सुद्धा या कल्पना आत्मसात करताना आढळतात. प्रथम भाषासदृश अशा भाषेतही या कल्पना आत्मसात करण्यास फारसे कष्ट पडत नसावे. उदा., बेळगावसारख्या ठिकाणी असलेले कन्नड-मराठी द्विभाषक, सोलापूरमध्ये मराठी, तेलुगू बोलणारे द्विभाषक वगैरेंना दोन्ही भाषांत या कल्पना व्यक्त करण्यात काही विशेष अडचणी येत असल्याचे ज्ञात नाही. त्यांचे कारण हे असावे, की या दोन्ही भाषा जवळपास एकाच पद्धतीने शिकल्या जात असाव्या.

द्वितीय आणि तृतीय भाषा शिकताना मात्र आल्स्टन यांचा मुद्दा उग्र स्वरूपात पुढे येऊ शकेल. प्रथम भाषा आत्मसातीकरणाच्या यशामुळे द्वितीय, तृतीय या भाषाही प्रथम भाषेप्रमाणेच शिकवाव्या, असा एक विचार बळावू शकतो. संरचनात्मक व्याकरण शिकविण्याऐवजी कार्यात्मक व्याकरण शिकवावे, हा विचारही आकर्षक वाटतो. पण प्रथम वा प्रथमसदृश भाषा आणि द्वितीय, तृतीय वगैरे भाषा यांच्या व्याप्तिक्षेत्रातच फार मोठा फरक असतो. हे ध्यानात घेऊनच त्यांचे अभ्यासक्रम ठरवावे लागतील. द्वितीय भाषा किंवा विशेषतः तृतीय भाषा एखाद्या विद्यार्थ्याला मातृभाषेसारखी वापरता यावी, ही अपेक्षा वस्तुस्थितीचा विपर्यास करणारी आहे. आपला मुलगा 'देशी साहेब' व्हावा, यासाठी आजकालच्या पालकांचे चाललेले प्रयत्न चिंताजनक वाटतात. एकेकाळी जे मेकॉलेचे उद्दिष्ट होते, पण जे मेकॉलेलाच काय, पण त्यानंतरच्या ही अनेक साहेबी शिक्षणतज्ज्ञांना शक्य झाले नाही, ते आमच्या देशबांधवांनी गेल्या वीसेक वर्षांच्या अवधीत फार मोठ्या प्रमाणात साध्य केल्याचे

दिसते. याच गतीने गेल्यास हा देश पूर्णपणे आंग्लाळलेला आहे, असे दृश्य दिसण्यास फार काळ लागेल, असे वाटत नाही.

याप्रमाणे सध्या आपल्या मूळ परंपरेची नाळ तोडून दुसऱ्या एका परंपरेची नाळ जोडण्याचा आमचा प्रयत्न चाललेला आहे. या देशाची माती, संस्कृती, समाजमूल्ये यांना नाकारणे– तेही केवळ भाषिक फरकाच्या आधारावर– हा नंदनवनात बागडण्याचा प्रकार आहे. केवळ भाषा बदलून आमची संस्कृती कायम ठेवणे आणि तिचा अभिमानही बाळगणे/व्यक्त करणे अशक्य आहे. कारण एलियटने म्हटल्याप्रमाणे आपण दुसरी भाषा हीच आपली मातृभाषा व्हावी, इतकी चांगली शिकता कामा नये, कारण त्याने आपले व्यक्तिमत्वच पूर्णपणे बदलते. दुसरीकडे या संस्कृतीची नाळ पूर्णतः तोडून इंग्रजी आत्मसात करणे हेही शक्य नाही. कारण या देशात पदोपदी त्याच संस्कृतीच्या वारशाने जीवन वाढलेले आहे. परकी भाषा ही साधनस्वरूप म्हणून वापरायची असते. जीवनस्वरूप म्हणून नव्हे, हा विवेक एकदा गेला, की भाषिक आणि मानसिक गुलामी आणि त्यामुळे येणारी तुच्छता कुणीही टाळू शकत नाही. तुमच्या मातृसंस्कृतीचे प्रतिबिंब तुमच्या मातृभाषेत पडते. तुमचे जीवनाचे मूलभूत आकलन हे तुमच्या मातृभाषेतून होते, (अगदी परदेशांत पिढ्यान् पिढ्या वास्तव्य करणाऱ्या कुटुंबांची सुद्धा अपवादात गणना करणे अवघड आहे.) त्या भाषेच्या आकलनात केवळ वस्तुशब्दांचे (content words) आणि व्याकरणिक शब्दांचे (grammatical words) अर्थ उपलब्ध होतात, असे नसून, भाषकाच्या जीवनाचे मूळ अधिष्ठानच त्यातून व्यक्त होते. सारासारविवेक एकदा विसरणाऱ्यांची गती ना घरका ना घाटका अशी होणार, यात आश्चर्य नाही.

दुसरा मुद्दा Logical atomismचा आहे. विद्यार्थ्याला ज्ञात होणारे शब्द वाक्यांतर्गत रचनेमुळे जास्त आकलनसुकर होतात, हे खरे आहे. साधारपणे, कोणतीही भाषा शिकविताना सोपे मुद्दे प्रथम आणि अवघड मुद्दे नंतर घेण्याची पद्धत कायमचीच आहे. प्रत्यक्षात मात्र द्वितीय, तृतीय वगैरे भाषा शिकताना फारच थोडे विद्यार्थी त्यात प्रावीण्य मिळवताना आढळतात. महाराष्ट्रीय कुटुंबातील इंग्रजी प्रथम भाषा म्हणून शिकणारे विद्यार्थी सुद्धा त्यात फार प्रावीण्य मिळविताना आढळत नाहीत. याचे कारण कदाचित ते वाक्य या एककानुसार इंग्रजी शिकलेले नाहीत, हेच असावे. पण वाक्याला एकक मानून भाषा शिकविण्यासाठी आवश्यक असणारे अभ्यासक्रम बनविणे हा सर्वस्वी नवीन स्वरूपाचा विषय असून त्यासंबंधी इथे फार चर्चा करण्याइतकी सामग्रीच उपलब्ध नाहीयू. पण सर्व भाषावैज्ञानिक, भाषातत्त्वज्ञ आणि भाषाशिक्षक यांनी त्या दृष्टीने प्रयत्न केल्यास कदाचित त्या तंत्राचा भरपूर विकास होईल.

Verifiability theory ही वेगळ्या अर्थाने Logical atomism ने दर्शविलेल्या द्वितीय, तृतीय भाषांच्या आत्मसातीकरणाचाच धोका दर्शविते. भाषाशिक्षणात प्रतिबिंबित होणाऱ्या परकीय संस्कृतीबद्दलची अनेक वाक्ये ही व्यवहारात : unveri-

fiable अशीच असतात. याचे एक विनोदी उदाहरण मी एका चिनी विद्यार्थ्याच्या कुटुंबाबद्दलच्या गोष्टीत वाचले होते.

ज्या गरीब कुटुंबाला दोन वेळचे अन्न मिळणे अवघड आहे, त्यातील मुलगा पुस्तकातील पार्ट्यांचे वर्णन वाचून शाळेत पार्टी करण्यासाठी घरातील पैसे चोरतो. एकत्र कुटुंबपद्धतीत अभ्यास करताना 'माझ्या कुटुंबात मी माझे आई-वडील आणि बहीण-भाऊ आहेत' अशा स्वरूपाची (nuclear family बद्दलची विधाने वाचून हलकल्लोळ माजवतो, 'लौकर शाळेत येणाऱ्या विद्यार्थ्याला परीराणी सोन्याची थैली देते; पण 'लौकर' म्हणजे केव्हा हे त्याला कळत नसते; 'पार्क', 'मिल्क' या शब्दांची कधी ऐंद्रिय अनुभूती न आल्याने या गोष्टी काल्पनिकच असतात. अशी त्याची समजूत होते; वगैरे वगैरे.

आता इतका अव्यवहार्य अभ्यासक्रम कोणी बनवीत असेल, असे वाटत नाही. पण प्रत्यक्षात स्वकीय संस्कृती परकीय भाषेत दाखविण्याचा लंबक दुसऱ्या टोकाकडे झुकल्यासारखा दिसतो. पाठ्यपुस्तकात इंग्रजी भाषा असली, तरी इंग्रजी संस्कृती, इंग्रजी वातावरण यांचे त्यातील निदर्शन फारच अल्प असते. तेही विद्यार्थ्यांना उपयुक्त ठरेल, असे वाटत नाही. स्वकीय संस्कृतीला बाधक न ठरणाऱ्या अशा जास्तीत जास्त गोष्टींचे परकीय संस्कृतीतील स्वरूप विद्यार्थ्यांना न समजता त्या भाषेचा आत्मा शिकविता येऊ शकेल, असे मानणे चुकीचे आहे.

तिसरा मुद्दा संदिग्धतेसंबंधीचा आहे. यावर वेगळा निबंधच लिहिणे आवश्यक आहे. पण संदिग्धतेचे स्वरूप ,तिची कारणे, तिचे प्रकार, तिची विविध प्रमाणे, तिचे उपयोग/दुरुपयोग वगैरेंसारख्या विषयांचा थोडा तरी अभ्यास मांडल्याखेरीज या विषयावर बोलणें हे खऱ्या अर्थाने उपपन्न होत नसले, तरी एवढे मात्र इथे नमूद करायला हवे, की ती मानवाच्या काही मूलभूत उणिवांचे निदर्शन करते, असे म्हणण्याऐवजी ती भाषेच्या मूलस्वरूपाचे अधिष्ठान आहे, असे म्हणणे जास्त सयुक्तिक आहे. संदिग्धतेचा अभ्यास केल्यावर भाषा यदृच्छास्वरूप का आहे, Logical atomism, verifiability वगैरे अपुऱ्या स्वरूपात का समोर येतात आणि मग भाषाशिक्षकाची कर्तव्ये कशी स्पष्ट होतात, ते निदर्शनास येते.

**टीपा :**

१) भाषाविज्ञानात या विषयांवर अनेक पुस्तके उपलब्ध आहेत. त्यांतही ब्लूमफील्ड यांचे 'लँग्विज' (१९३३), एडवर्ड सपीर यांचे 'लँग्विज', '(१९२१) बी.एल्. व्हार्फ यांचे 'लँग्विज, थॉट अँड रिॲलिटी' (१९५६), डेल हाईम्न (सं) 'लँग्विज' इन कल्चर अँड सोसायटी (१९६४), इत्यादी अधिक महत्त्वाची आहेत.

२) या विषयाची चर्चा आल्स्टन 'फिलॉसफी अव लँग्विज' (१९८८), ब्राऊन 'वर्डज् अँड थिंग्ज' (१९५८) वगैरेंत आढळेल, त्रोटक चर्चेसाठी शैलेश स. पुंडलिक

'अर्थनिर्धारणाची प्रक्रिया आणि भाषाविज्ञान' भाषा आणि जीवन, वर्षे १३ : अंक २ : उन्हाळा, १९९५.

३) ऐकमत्य स्वतःप्रमाण मानले, तर (म्हणजे ते अनुभूती वा इतर ऐकमत्यावर आधारित नसले, तर) ते पूर्णपणे यदृच्छास्वरूप होईल. मग ते **नियमाने** सर्वत्र वापरता यावे, असे होणार नाही. पण भाषिक ऐकमत्य हे तर नियमाने वापरण्यासाठीच मांडलेले आहे. तेव्हा यदृच्छास्वरूप ऐकमत्य स्वव्याघाती होईल.

४) आल्स्टन, डब्ल्यू.पी. (१९८८) फिलॉसफी अव् लँग्विज (प्रेंटिस हॉल अव् इंडिया प्रा.लि., नवी दिल्ली) पृ.६५

५) तत्रैव पृ. ६८

६) रसेल बी. (१९५६) फिलॉसफी अव् लॉजिकल ॲटॉमिझम' in आर.सी.मार्श (सं:) लॉजिक अँड नॉलेज (जॉर्ज ॲलन अँड अनविन, लंडन)

रसेल हे निळ्या कपाला 'निळा कप' असे म्हणण्याऐवजी 'वर्तुळाकृती, निळसर, दृश्य असा अनुभूतिविषय' म्हणणे जास्त पसंत करतील. कारण ज्ञात होणाऱ्या अनुभूति– विषयाला 'कप' ही संज्ञा मानवाने दिलेली आहे. ती संज्ञा दृश्य नाही. अशा वेळेस ती अणुरूप वाक्यांमध्ये वापरता येत नाही. पण आपल्या सोयीसाठी आपण त्याला कप म्हटले, तरी फारसे बिघडणार नाही.

७) या विषयावर स्लोबिन, डी. (१९७५), स्टाईनबर्ग, डी. (१९८२), क्लिमा अँड बेलुजी (१९६६), ब्राऊन अँड बेलुजी (१९६४), ब्राऊन, काझडेन अँड बेलुजी (१९६९) वगैरेंचा अभ्यास प्रसिद्ध आहे.

लहान मुलांतील ज्ञानग्रहणाची क्रिया ही प्रत्यक्ष अनुभवाचा विषय होऊ शकत नाही, हे खरे आहे. परंतु उपलब्ध पुरावा जे दर्शवितो, त्यावरून असे दिसते, की अगदी १२ ते १८ महिने, २ ते ३ वर्षे या कालखंडातही एक शब्द-पातळी, द्विशब्द-पातळी यांसारख्या प्राथमिक पातळ्यांवरही मुले वाक्यरचनेचे नियम (तयार करून, तपासून) वापरत असावे.

पाहा : स्टाईनबर्ग (१९८२) सायकोलिंग्विस्टिकस पृ. १५१

८) पाहा केळकर, अ.रा. (१९८०) 'The Anatomy of a Dictionary in बी.जी. मिश्र (सं.) लेक्सिकोग्राफी इन् इंडिया (CIIL, Mysore) पृ. २०८

प्रा. केळकरांचे प्रत्यक्ष शब्द असे आहेत.

"These three parts are respectively a) a description of usage including indications of typical collocations and cross- references..."

प्रा. केळकर अर्थनिर्धारणाच्या प्रत्यक्ष पद्धतीसंबंधी लिहीत नसले, तरी त्यांच्या विधानातून – विशेषतः, त्यांनी उल्लेख केलेल्या collocations च्या मुद्द्यावरून ती ध्वनित होते.

९) वाक्यखंड म्हणजे वस्तुतः वाक्य नव्हे. भाषावैज्ञानिक ते मान्यही करणार





अनुक्रमणिका

नाहीत. खरे पाहता Is he? या वाक्यखंडाने Is he good?, Is he brave? यांसारखी वेगवेगळी वाक्ये त्यांच्या त्यांच्या संदर्भानुसार व्यक्त केली जातात. केवळ Is he, Is he? असे वाक्यखंड अनेक ठिकाणी, अनेक वेळा आवर्त होताना दिसतात. याचा अर्थ, ते एकच वाक्य आहे, असा होत नाही. अर्थात ते प्रश्न असल्याने Logical atomism मध्ये त्याला वाक्य म्हणता येणार नाही. तथापि, Is he good?, Is he brave? याचे उत्तर He is असे दिल्यावर ते observation sentence आहे, असे म्हणायला प्रत्यवाय नाही.

१०) सर्वसामान्य भाषक काही आवर्ती नियमांचा (recursive rules) वापर करून (किंवा व्याकरणिक साच्यात अनेक पर्यायी शब्द वापरत) अनेक नवी वाक्ये बनवू शकतो. उदा., This is the house that Jack built हे वाक्य कितीही लांब वाढवीत नेले, तरी त्याची वाढण्याची क्षमता संपली, असे म्हणता येत नाही.

अनंत नवी वाक्ये तयार करण्याच्या भाषेच्या या क्षमतेला भाषावैज्ञानिक 'भाषेची सर्जनशीलता' असे म्हणतात. या विषयावर चॉम्स्की, एन्. (१९७२) 'लँग्विज अँड माईंड' पाहा.

११) आल्स्टन, डब्ल्यू. पी. loc. cit. पृ. ७१.

१२) अर्थपूर्णता किंवा निरर्थकता ही मूल्यविधाने (value judgement) साठी वापरलेली नाहीत. म्हणजे निरर्थक हा शब्द निंदाव्यंजक नाही. त्याचा अर्थ एवढाच, की निरर्थक असणारे वाक्य सिद्ध किंवा असिद्ध करता येत नाही. पाहा : ए. जे. एअर (१९४६) आणि रूडॉल्फ कारनॅप (१९५५)

१३) टॉमस, डिलन (१९७१)
डॅनियल जोन्स (सं) डिलन टॉमस : द पोएम्ज
(जे. एम्. डेंट अँड सन्ज लि., लंडन) पृ. ७७

१४) एलियट, टी. एस्. (१९३६) कंपूलीट पोएम्ज
(फेबर अँड फेबर, लंडन) पृ. ९५

१५) स्टाईनबर्ग loc. cit. पृ. १५७.

**भाषाशिक्षण विभाग, एस्. एन्. डी. टी. महिला विद्यापीठ, मुंबई ४०००२०.**

□□





अनुक्रमणिका

# एका शब्दाचा पाठलाग!

श्रीपाद जोशी

मराठीत एक जुनी म्हण आहे. 'नदीचे मूळ आणि ऋषीचे कूळ पाहू (शोधू) नये' शब्दकोशकार या म्हणीसंबंधी असा खुलासा करतात :-'केवढीही मोठी नदी असली, तरी तिचा उगम एखाद्या ओहोळापासून झालेला असतो. तसेच पुष्कळ ऋषींचा जन्म जारज किंवा हीन कुळात झाला असल्याच्या कथा महाभारत वगैरे ग्रंथांतून आहेत. म्हणून त्यांचे मूळ शोधू नये, कारण ते अनादरास कारण होते. एखाद्या गोष्टीचा अधिक छडा लावीत न बसता चालू गोष्टीकडे लक्ष द्यावे, या अर्थी उपयोग.'

खरे तर, प्रत्येक म्हण ही चिरनूतन असते. ती कधी जुनी, कालबाह्य होत नसते. तरीही मी ही म्हण जुनी असल्याचे विधान केले आहे. त्याचे कारण असे, की तिच्यात आता पूर्वीइतके सामर्थ्य उरलेले नाही. आधुनिक काळात नदीचे मूळ शोधून काढणे हा मोठा पुरुषार्थ, पराक्रम समजला जातो. त्यापायी अनेक धाडसी स्त्री-पुरुष असंख्य संकटे झेलतात; इतकेच नव्हे, तर प्रसंगी आपला जीवही धोक्यात घालतात; आणि जेव्हा ते नदीच्या मुळाचा शोध लावण्यात यशस्वी होतात, तेव्हा जगभर त्यांची वाहवा होते. कधी कधी त्यांना अपयशही येते. पण त्यांचे ते अपयश यशाइतकेच तेजस्वी, कौतुकास्पद ठरते.

अशीच काहीशी गोष्ट ऋषींच्या म्हणजे थोर स्त्री-पुरुषांच्या कुळांसंबंधीही झाली आहे. आजकाल कलावंत, साहित्यिक, राजकीय पुढारी, शूर सेनापती, इत्यादींच्या कुळाची कोणी चौकशी करीत नाही. त्यांचे कार्य, कला, शौर्य ही पाहिली जातात. किंबहुना हलक्या कुळात जन्म घेऊन जगाचे डोळे दिपविणारा पराक्रम करणाऱ्याचे थोडे अधिकच कौतुक होते. हे लक्षात आल्यापासून आपल्या हलक्या कुळशीलाचे प्रदर्शन करण्याची आणि त्यापासून भरपूर फायदा घेण्याची जणू चढाओढच लागली असावी, असा कधी कधी भास होतो.

म्हणून ही म्हण आता जुनी झाली आहे, असे मी म्हटले आहे.

**शब्दाचे मूळ आणि कूळ**

हे सारे सुचण्याचे कारण जरा वेगळेच आहे. माणूस, पशुपक्षी, वृक्ष-वनस्पती यांचे मूळ आणि कूळ शोधण्याचे जसे एक प्रकारचे कुतूहल असते, तसेच, शब्दाचे मूळ आणि कूळ शोधण्याची जिज्ञासा व हौस माणसांमध्ये फार जुन्या काळापासून असली पाहिजे.

त्यातूनच व्युत्पत्तिशास्त्राचा जन्म झाला असावा. आपण जन्मभर हजारो, लाखो शब्द वापरत असतो. त्या सर्वांविषयीच आपल्याला असे कुतूहल वाटत नाही. रोज भेटणाऱ्या माणसांविषयी आपल्या मनात फारसे कुतूहल नसते. परंतु एखाद्या वेळी एखादी नवी, वेगळी व्यक्ती दिसते आणि आपली जिज्ञासा चाळवली जाते. ही व्यक्ती कोण असावी? ती कुठून आली असावी? ती कशी आली असेल? तिच्या येण्याचे प्रयोजन काय असेल? वगैरे अनेक प्रश्न आपल्या मनात उत्पन्न होतात. त्या प्रश्नांची समाधानकारक उत्तरे मिळाल्याखेरीज आपल्याला चैन पडत नाही. तीच गोष्ट शब्दांच्या बाबतीतही घडते. एखाद्या शब्दाचे मूळ व कूळ काय असावे, अशी शंका आपल्या मनात निर्माण झाली, की तिचे निर्मूलन किंवा निरसन होईपर्यंत ती आपला पिच्छा सोडीत नाही. शब्दांच्या अर्थांच्या बाबतीत तर हा अनुभव आपल्यापैकी अनेकांना वारंवार येत असतो. मी स्वतः एक छोटासा शब्दकोशकार आहे. हिंदी, मराठी, उर्दू या भाषांचे सात-आठ लहान-मोठे शब्दकोश मी तयार केले आहेत. ते तयार करीत असताना मला अनेक शब्दांनी फार छळले. त्याची दोन-चार गमतीदार उदाहरणे सहज आठवतात. अलीकडे दूरदर्शनवरील हिंदी मालिकांमध्ये दोन शब्द पुनः पुन्हा कानांवर पडत होते. एका होता 'कंचा' आणि दुसरा होता 'राजमा'. संदर्भावरून त्यांचे अर्थ लक्षात येत होते. पण ते कोणत्याच हिंदीच्या शब्दकोशात सापडत नव्हते. मोठ्या प्रयासानंतर 'कंचा' शब्द महाराष्ट्र शब्दकोशात सापडला. 'कंचा' हा नागपुरी शब्द असून त्याचा अर्थ काचेची गोटी, बैदूल असा आहे. 'काच'' या शब्दापासून तो बनला आहे. बहुधा वऱ्हाडातून मध्यप्रदेशात मुलांपर्यंत तो गेला असावा आणि त्याने 'कंचा' असे रूप धारण करून हिंदीत प्रवेश मिळविला असावा. हिंदीतही 'काँच' हा शब्द आहेच. त्यापासून कंचा हा शब्द बनला असण्याची शक्यता नाकारता येत नाही. पण मग कोणत्याच हिंदी कोशात त्याला स्थान का मिळाले नसेल? म्हणूनच मुळात मराठी असणारा तो शब्द नागपूरमार्गे हिंदीत गेला असला पाहिजे, असा निष्कर्ष मी काढला!

राजमाच्या बाबतीत थोडी जास्त धडपड करावी लागली. पंजाबच्या पार्श्वभूमीवरील एका हिंदी नाटकात 'राजमाकी भाजी' हे एक आवडते तोंडी लावणे असल्याचे दिसून आले. पण हा 'राजमा' कुठल्याच शब्दकोशात सापडेना. म्हणून मी माझ्या भात्यातले शेवटचे अस्त्र काढले. माझ्या हिंदीभाषी मित्रांना पत्र लिहून त्या शब्दाचा अर्थ विचारला. पण कोणाकडूनच समाधानकारक उत्तर मिळाले नाही. मी खूप निराश झालो. खरे तर, हा तसा अगदीच वेडपटपणा होता. राजमाचा अर्थ न कळल्यामुळे माझे काहीच अडणार नव्हते. पण ती जिज्ञासा स्वस्थ बसू देत नव्हती, एवढे खरे. अखेर येथील 'बालभारती' मधील हिंदी विभागाचे त्या वेळचे प्रमुख आणि माझे जुने स्नेही श्री स्वामीनाथ सिंह यांना मी तोच प्रश्न विचारला. अखेर एक दिवस प्लॅस्टिकच्या दोन पिशव्यांतून खुद्द 'राजमा' साहेबांनाच ते घेऊन आले! ते म्हणाले, ''जोशीजी, राजमा के लिए मराठीका प्रतिशब्द मैं आपको नहीं बता सका। तब मैंने सोचा कि आपको राजमा ही दिखाया





अनुक्रमणिका

जाय। इसलिए यह ले आया हूँ। आप इसकी भाजी बना लीजिए। बडी जायकेदार होती है।'' आणि मी पाहिले, तर काय? तो तर काळा घेवडा होता! त्याची भाजी, म्हणजे रसदार उसळ. पंजाबी लोकांचे ते आवडते खाद्य आहे. 'मक्कीकी रोटी और सरसों का साग' हे जितके आवडते पदार्थ, तितकीच 'राजमा की भाजी'!

तर असा हा शब्दांविषयीचा नादिष्टपणा किंवा छांदिष्टपणा माझ्या पाचवीला पुजलेला असावा. म्हणूनच शब्दकोशांचे संपादन करताना मला सदैव आनंद मिळाला.

**'कंगाल' ने झोप उडविली!**

या सर्वांवर कडी केली 'कंगाल' या शब्दाने!

अगदी परवा परवा घडलेली घटना आहे. मार्च, १९९३ मधली. कै.कृ.पां.कुलकर्णी यांच्या 'मराठी व्युत्पत्ति कोश' या महाग्रंथाच्या तिसऱ्या आवृत्तीसाठी पुरवणी तयार करण्याचे काम (किंवहुना विकतचे श्राद्ध!) मी आपण होऊन अंगावर घेतले आणि त्यात गढून गेलो. मुख्यतः अरबी, फारसी व कानडी या तीन भाषांतून मराठीत आलेल्या शब्दांविषयी मूळ व्युत्पत्तिकोशात नसलेली माहिती द्यावयाची आणि चुकीची माहिती दुरुस्त करावयाची, असे त्या कामाचे स्वरूप होते. ते करीत असता 'कंगाल' या शब्दाशी मी अडखळलो. व्युत्पत्तिकोशकारांनी त्या शब्दाविषयी पुढीलप्रमाने माहिती दिली आहे: 'कंगाल - वि.गरीब, भिकारी, दरिद्री. Poor, Penniless (सं.कंकाल = हाडाचा सापळा; पाप्रा.कंकाल; का.कगाल; बं.कंगाल; ओ.कॉगाळ; हिं.कगाल; सिं.ककालु; फा.कंगालह = चिक्कू)' यांपैकी कानडी, बंगाली व हिंदी भाषांमध्ये 'कगाल' असा शब्द नाही. बहुधा 'क' वरील अनुस्वार व्युत्पत्तिकोशात उडून गेला असावा. बंगालीत 'कांगाल' असा शब्द असून, तो देशी असल्याचे कोशकारांनी नमूद केले आहे. मात्र देशीच्या पुढे प्रश्नचिन्ह आहे. यावरून त्यांना आपल्या व्युत्पत्तीविषयी खात्री वाटत नसावी, असे दिसते. कानडीत 'कग्गाल' असा एक शब्द असून त्याचा अर्थ 'दुष्काळ', 'अनावृष्टी' असा आहे. (कन्नड-मराठी शब्दकोश; सं.पुंडलीकजी कातगडे) डॉ. किट्टेलने या शब्दाचा अर्थ Scarcity, famine असा दिला आहे. जॉन गॅरेटने हा शब्द घेतलेलाच नाही. कानडीत 'कंगाल' हा शब्दही असून, त्याचा अर्थ किट्टेलने Poor, poverty-stricken; weak; destitute असा दिला आहे व तो हिंदीतून आला असल्याचे नमूद केले आहे. गॅरेटने 'कंगाल' व 'कसेगाळ' असे दोन शब्द दिले असून त्यांचे दोन अर्थ दिले आहेत. 1) Poor, destitute 2) Blind. ('कसेगाळ' हा शब्द किट्टेलने अथवा कातगडेंनी दिलेला नाही.) किट्टेलने कंगाल = कंगार (कन्नड) displeasure असा आणखी एक शब्द दिला आहे व तो कन्नडचा असल्याचे नमूद केले आहे.

**'कंगाल' हा फारसीचा शब्द आहे काय?**

येथपर्यंत सर्व ठीक झाले. परंतु फारसी 'कंगालह = चिक्कू' या उल्लेखाने मी थोडा चमकलो. वस्तुतः 'कंकाल' या संस्कृत शब्दापासून 'कंगाल' हा शब्द आला आहे, हे

अगदी उघड दिसत असताना फारसीच्या 'कंगालह = चिक्कू' या शब्दाकडे जाण्याचे काहीच कारण नव्हते. दारिद्य, दुष्काळ, उपासमार वगैरे कारणांमुळे केवळ हाडाचे सांगाडे उरलेली माणसे आपण पाहतो. त्यावरून कंगाल म्हणजे गरीब, भिकारी, दरिद्री हा शब्द व अर्थ रूढ होणे स्वाभाविक होते. तेथेच हा प्रश्न संपावयास हवा होता. मग चिक्कू हा अर्थ असणारा 'कंगालह' हा फारसी शब्द उद्‌धृत करण्याचे प्रयोजन काय असावे ? चिक्कू या शब्दाचा निर्धन, गरीब, भिकारी यांच्याशी संबंधच काय ? किंबहुना जो सधन, श्रीमंत, सुखवस्तू असेल, तोच चिक्कू असण्याची शक्यता अधिक असते. ज्याच्याजवळ दु:ख व दारिद्य यांच्याखेरीज काहीच नसेल, त्याने, कंजूषपणा करावा, असे काय असू शकते ? एकूणच काही तरी गफलत झाली असावी, असा विचार करीत असता कंगाल हा खरोखरीच फारसी शब्द आहे काय, अशी शंका माझ्या मनात उत्पन्न झाली; आणि व्युत्पत्तीचे काम थोडा वेळ बाजूला ठेवून, 'कंगाल' या शब्दाचा फारसीशी काही संबंध असेल, की नाही, याचाच शोध घेण्यात मन गुंतून गेले.

**उर्दू शब्दकोशांनी दिलेला नकार**

माझ्या खासगी संग्रहामध्ये मराठी, हिंदी, उर्दू, गुजराती, बंगाली, इंग्रजी, कन्नड, कोकणी, असमीया, अरबी, संस्कृत, जपानी, फ्रेंच वगैरे भाषांचे पुष्कळ शब्दकोश आहेत. गेल्या पन्नास वर्षांत केलेली ती माझी अत्यंत मौल्यवान कमाई आहे. मधमाशीने एकेक थेंब गोळा करावा, तसे ते मी जमवले आहेत. त्यांमध्ये अनेक कोश शंभर सव्वाशे वर्षांपूर्वीचे व दुर्मीळ आहेत. या शब्दकोशांपैकी सर्वांत महत्त्वाचे असे कोश उर्दूचे आहेत. उर्दू-उर्दू, उर्दू-हिंदी, उर्दू-मराठी, उर्दू-इंग्रजी, इंग्रजी-उर्दू असे त्यांचे अनेक प्रकार आहेत. उर्दूचे अधिकांश शब्दकोश अरबी, फारसी, तुर्की वगैरे परकीय भाषांचेच शब्द देतात. त्यामुळे अरबी-फारसीचे बहुतेक सर्व उर्दूत प्रचलित असणारे शब्द या कोशांत मिळतात. त्यामुळे अरबी-फारसीचे वेगळे शब्दकोश पाहावे लागत नाहीत. या शब्दकोशांत हिंदीतून उर्दूत आलेल्या शब्दांचा समावेश नसतो. त्यावरून एखादा उर्दूत प्रचलित असणारा शब्द या कोशांत न सापडल्यास तो अरबी-फारसीचा नसला पाहिजे, असे ठामपणे सांगता येते. म्हणून प्रथम मी 'लुगाते सईदी' (संपादक : मौलवी अब्दुल अजीज, प्रकाशक : मतबा मजीदी, कानपूर; १९३६, पृ.६४४, शब्दसंख्या ५२ हजार) हा अत्यंत महत्त्वाचा शब्दकोश पाहिला. त्यात 'कंगालह' हा शब्द नव्हता. त्यामुळे अर्थातच १४ हजार शब्दांच्या लहानशा 'करीमुल्लुगात' या सर्वत्र प्रचलित असलेल्या शब्दकोशात तो नसल्यास आश्चर्य वाटण्याचे कारण नव्हते. म्हणून मग मी 'फीरोजुल्लुगाते उर्दू' (लाहौर, १९४६, पृष्ठे : १४२६, शब्द.५० हजार), 'सईदी डिक्शनरी' (सं.मुनीर लखनवी; कानपूर, १९४०, पृ.१४०६, श. ३४ हजार) व लुगाते किश्वरी (सं.मौलवी तसद्दुक हुसेन; प्र.मुन्शी नवलकिशोर, लखनौ १९४७ पृ.५८४, श.३० हजार) हे तीन शब्दकोश पाहिले. त्या तिन्ही कोशांनी 'कंगाल' हा हिंदीचा शब्द असून, त्याचा अर्थ मुहताज (अ.) मुफलिस (अ.) तंगदस्त (फा.) तंगहाल (फा.) असा

असल्याचे नमूद केले आहे. म्हणजे असे, की एका हिंदी शब्दाचा अर्थ विशद करणारे दोन अरबी व दोन फारसी शब्द त्यांनी दिले आहेत. त्यांचा अर्थ गरीब, दरिद्री असाच आहे. कोणाही उर्दू शब्दकोशकाराने 'कंगाल' चा अर्थ चिक्कू (कंजूष; शूम; बखील) असा दिलेला नाही.

पुणे विद्यापीठाच्या हिंदी विभागातील प्रा.केशव प्रथमवीर यांनी पूना कॉलेजचे प्रा. जागिरदार यांच्याकडून जी माहिती मिळवून मला पाठविली, तिच्यामध्ये 'फरहंग-ए-आसफिया'ज या बृहत् उर्दू कोशाच्या १९७४ च्या आवृत्तीत 'कंगाल' हा शब्द हिंदीचा असल्याचे नमूद केले आहे. त्याचा अर्थ गरीब, निर्धन असाच आहे. याचा अर्थ असा, की उर्दूवाल्यांना 'कंगाल' हा शब्द फारसीचा असल्याचे मुळीच मान्य नाही.

ही झाली उर्दू लिपीतील शब्दकोशांची कथा. नागरी लिपीतील दोन मोठे शब्दकोश माझ्या संग्रही आहेत. त्यांपैकी एक आहे उत्तर प्रदेश सरकारने १९५९ साली प्रसिद्ध केलेला व मुहम्मद मुस्तफा खाँ 'मद्दाह' यांनी संपादिलेला ७६० पृष्ठे व ३६ हजार शब्द असलेला 'उर्दू- हिंदी शब्दकोश' आणि दुसरा खुद्द माझाच 'उर्दू-मराठी शब्दकोश' (महाराष्ट्र सरकार, पृ.५००, श.२५ हजार, १९६८) आहे. या दोन्ही शब्दकोशांनी 'कंगाल' हा शब्द दिलेला नाही.

**मग हा अर्थ आला कोठून?**

मग हा मराठीतच अर्थ आला कोठून? हा प्रश्न मला सतावू लागला. त्याचे उत्तर मिळाल्याखेरीज मला स्वस्थता लाभणार नव्हती. म्हणून त्याचा शोध घेण्यासाठी मी हात धुऊन कोशांच्या व विद्वानांच्या मागे लागलो.

याचा शोध घेताना एक मजेदार गोष्ट आढळून आली. पुण्याच्या भारत इतिहास संशोधक मंडळातर्फे प्रा.दत्तो वामन पोतदार यांच्या प्रस्तावनेसह १९२५ साली प्रकाशित झालेल्या प्रा.माधव त्रिंबक पटवर्धन यांच्या 'फार्शी-मराठी-कोश' या शब्दकोशात 'कङ्गाल (फा.कङ्गालः चिक्कू, भिकारी; दरिद्री)' हा शब्द (पृ.२३) आला आहे. पुढे १९३३ साली प्रकाशित झालेल्या दाते-कर्वे यांच्या 'महाराष्ट्र शब्दकोशा' ने ती व्युत्पत्ती प्रमाण मानून (फा. कंगाल (पृ.५३७) अशी व्युत्पत्ती दिली. कै.कृ.पां.कुलकर्णी यांनी १९४६ साली प्रकाशित झालेल्या आपल्या 'मराठी व्युत्पत्ती कोशा' ते (फा. कंगालह् = चिक्कू) असा तटस्थ उल्लेख केला आहे. डॉ.यू.म.पठाण यांनी 'मराठी बखरीतील फारसीचे स्वरूप' या मराठवाडा विद्यापीठातर्फे १९७३ साली प्रकाशित झालेल्या आपल्या पीएच्.डी.च्या प्रबंधात पृ.४७ व ३६६ वर कंगाल (पुं.वि.) फा.कंगालह् = भिकारी; दरिद्री अशी व्युत्पत्ती दिली आहे. याचा अर्थ असाच, की माधवराव पटवर्धनांनी दिलेली व्युत्पत्ती प्रमाण मानून त्यांच्यानंतर आलेल्या सर्व मराठी विद्वज्ञनांनी ती स्वीकारली. त्यांच्यापैकी कोणाच्याही मनात असा प्रश्न उत्पन्न झाला नाही, की चिक्कू या शब्दाचा अर्थ भिकारी, दरिद्री असा लावणे कितपत योग्य आहे? अर्थात चिक्कूपणा म्हणजे मानसिक दारिद्र्य असा अर्थ घ्यावयाचे ठरल्यास श्रीमंत

माणूसही मनाने कंगाल ठरू शकतो. पण हा फारच दूरान्वित अर्थ झाला. त्याचा विचार या संदर्भात करण्याचे कारण नाही.

**चिक्कू हा अर्थही संशयास्पद**

अशा प्रकारे मानसिक गोंधळ निर्माण झाल्यावर 'चिक्कू'' हा अर्थ देणारा एखादा फारसी-हिंदी, फारसी-उर्दू किंवा फारसी-इंग्रजी शब्दकोश मिळतो का, असा शोध घेण्यास मी सुरुवात केली. फारसी- हिंदी शब्दकोश मला मिळाला नाही. लुगाते फारसी (The Standard Persian Dictionary) हा सुमारे १ हजार पृष्ठे व ४० हजार शब्द असलेला फारसी-उर्दू शब्दकोश फर्ग्युसन महाविद्यालयाच्या ग्रंथालयात मिळाला; त्यात 'कंगाल' हा शब्द नाही. याचा अर्थ असा, की उर्दू भाषी शब्दकोशकार 'कंगाल' हा शब्द फारसीचा मानण्यास तयार नाहीत. अलाहाबादच्या ज्या राम नारायण लाल या प्रख्यात प्रकाशकाने 'लुगाते फारसी' १९३१ साली प्रकाशित केला आहे त्यानेच डॉ.एस्.सी.पॉल यांनी संपादिलेला 'The New Royal Persian English Dictionary' (१९३२, पृ.५६२, श.२६ हजार) हा शब्दकोश त्याच ग्रंथालयात मिळाला. त्यातही 'कंगाल' या शब्दाला स्थान मिळालेले नाही. मात्र तेथेच F. Steingass या म्यूनिच विद्यापीठातील प्राध्यापकांनी संपादिलेला व लंडनच्या W.H. Allen या संस्थेने प्रकाशित केलेला (काळ दिलेला नाही; पृ.१५४०, शब्द ७७ हजार) A comprehensine Persian English Dictionary हा शब्दकोश मिळाला. त्यावर Published under the Patronage of the Secretary of State for India in Council असा उल्लेख आहे. त्यावरून तो बराच जुना असावा, असे वाटते. त्यामध्ये 'कंगाल' Kangala (फारसी लिपीत कंगालह्) हा शब्द असून त्याचे पुढीलप्रमाणे पाच अर्थ दिले आहेत. 1) A dangling affer women. 2) a matrimonial Suit 3) a courtesan 4) a miser 5) name of a mountain in Khurasan. त्याच ग्रंथालयात A. T. Shahaney, M. J. Shahaney & Maulavi mir Zamam यांनी संपादिलेला The Modern Persian English Dictionary (प्र.दि एज्युकॅशनल पब्लिशिंग कं. कराची; पृ.८०५, श.२४ हजार) हा आणखी एक शब्दकोश मिळाला. त्यात 'कंगालह्' या शब्दाचा समावेश असून त्याचे फक्त दोनच अर्थ दिले आहेत. 1) A courtezan 2) a dangling affer women.

याचा अर्थ असा, की 'कंगाल' या शब्दाचा 'बायकांच्या नादी लागणारा', 'वारांगना', 'कलावंतीण' हाच अर्थ फारसीत प्रचलित असून, 'चिक्कू' हा अर्थ सर्वच कोशकारांना मान्य नाही.

**'माधवराव पटवर्धन यांचे मत प्रमाण मानावे!'**

मग माधवरावांनी चिक्कू हा अत्यंत अप्रचलित अर्थ स्वीकारून, त्यावरून दूरान्वयानेही निघू न शकणारा भिकारी, दरिद्री असा अर्थ काढला? कंगाल शब्दाची व्युत्पत्ती फारसी कंगालह् या शब्दापासून काढण्याचा अट्टहास त्यांनी का केला असावा?

मी फारसी-अरबीचा थोडा-फार, कामचलाऊ अभ्यास केला असला, तरी त्या भाषांचा मी काही तज्ज्ञ नव्हे. म्हणून फारसीच्या काही विद्वानांना या मुद्द्यासंबंधी अधिक खुलासा विचारावा, म्हणून श्री सेतु माधवराव पगडी, डॉ.यू.म.पठाण, मुंबई विद्यापीठातील उर्दू विभागाचे प्रमुख डॉ. अब्दुलसत्तार दळवी, स.मा.गर्गे, पुण्याचे अँग्लो उर्दू हायस्कूल व वाडिया कॉलेज यांचे प्राचार्य, य.दि.फडके, पुणे विद्यापीठातील हिंदीचे प्राध्यापक केशव प्रथमवीर यांना पत्रे पाठविली. बहुतेकांना जोड-कार्डे पाठविली होती. त्यांच्यापैकी डॉ. प्रथमवीर यांनी पुष्कळ माहिती पुरविली. डॉ.पठाण व श्री.पगडी यांनी उत्तरे पाठविली. इतरांनी पत्राची पोचही दिली नाही. (श्री.स.मा.गर्गे यांची भेट झाली असता आपल्या फारसीचा अभ्यास नसल्याचे त्यांनी सांगितले.) माझ्या दृष्टीने दोन मुद्दे महत्त्वाचे होते. 'कंगालह्' या फारसी शब्दाचा भिकारी, दरिद्री असा अर्थ देणारा मराठीखेरीज एखादा शब्दकोश अस्तित्वात आहे काय? ('कंगाल' असा शब्द फारसीत नसल्याचे सर्वच कोशांनी मान्य केले आहे.) आणि 'चिक्कू' या शब्दातून भिकारी, दरिद्री असा अर्थ काढणे कितपत योग्य आहे? मी मुख्यतः मला ओळखणारे डॉ.पठाण, डॉ. दळवी व श्री. पगडी यांच्याकडून समाधानकारक खुलासा मिळेल, अशी आशा बाळगली होती. पण ती पूर्ण झाली नाही. श्री.पगडी यांनी ता. ३/३/९३ च्या पत्रात लिहिले, 'माझ्या मते माधवराव पटवर्धन यांचे मत प्रमाण मानावे. कंगाल शब्दासंबंधी पटवर्धनांनी योग्य चौकशी करूनच लिहिले असावे.' माधवरावांना प्रमाण मानल्याने पगडींचा प्रश्न सुटला. पण कुणा व्यक्तीला प्रमाण न मानणाऱ्या माझा प्रश्न तसाच राहिला! ग्रंथप्रामाण्य व व्यक्तिप्रामाण्य यांविरुद्ध धर्मयुद्ध करीत असल्याचा आव आणणाऱ्या टिळक-गांधी-मार्क्स-फुले-आंबेडकरांच्या अंधभक्तांची चलती असलेल्या या देशात माझ्यासारख्यांच्या नशिबी याच्याखेरीज दुसरे काय असणार? माझे हे भागधेय मी कधीच नाकारलेले नाही; किंबहुना ते आनंदाने स्वीकारले आहे.

**डॉ. पठाण यांची वेगळी तऱ्हा**

डॉ. यू. म. पठाण यांनी आपल्या बिनतारखेच्या पत्रात लिहिले, 'कंगाल हा शब्द मूळ फार्सीच आहे. कंगाला हे त्याचे मूळ रूप नसून, कंगाल हेच मूळ रूप असल्याचे मला स्मरते. तो मूळचा हिंदी नाही. तो फार्सीतूनच हिंदीत आला आहे. पटवर्धनांनी तो समकालीन उपलब्ध अरबी-फारसी कोशातूनच घेतला असावा. पण त्याचे 'कंगाला' असे रूप का केले, कळत नाही!' पठाणांचे हे पत्र मिळाल्यानंतर 'बयानुल्लिसान' (अरबी-उर्दू डिक्शनरी) (सं.क़ाजी जैनुल आबिदैन सज्जाद मेरठी; प्र.इदारा ए इल्मिया, मेरठ; १९४१, पृ.८६३, श.२६ हजार) या अरबी शब्दकोशात आम्ही शोधले; पण त्यात 'कंगाल' किंवा ''कंगालह' हा शब्द सापडला नाही. तो सापडणे शक्यच नव्हते. कारण अरबीत 'ग' (गाफ) हे व्यंजनच नाही. (हे आम्हांला आधीच माहीत होते!)

शब्दकोशांच्या संशोधनातून हाती काही लागत नाही, हे लक्षात आल्यावर मला आणखी एक उपाय सुचला. फारसीचे अध्ययन-अध्यापन करणाऱ्या तीन विद्वानांना

मी गाठले आणि विचारले, 'कंगालह्' हा शब्द तुमच्या फ़ारसी वाचनात कोठे आला आहे काय ?' यावर त्यांनी स्पष्टपणे सांगितले की, 'असा शब्द आम्हांला फारसीत मुळीच आढळला नाही.' त्या विद्वानांची नावे अशी : डॉ.अमानत (माजी अध्यक्ष, उर्दू-फारसी विभाग, पुणे विद्यापीठ) मौ.हसन अब्बास 'फितरत', संपादक, 'सदाकत', पुणे व डॉ. इब्राहीम फैज (उर्दू-फारसीचे माजी प्राध्यापक व कवी, वाडिया कॉलेज, पुणे) आणि एका शब्दाचा पाठलाग हा मृगजळामागे लागलेल्या हरिणाच्या शोधासारखा निष्फळच ठरला.

या संदर्भात आणखी एक गोष्ट सांगितली पाहिजे. फारसीच्या शब्दकोशात अरबीचे शब्द भरपूर असतात. पण अरबीच्या शब्दकोशात फारसीचे शब्द नसतात. बहुधा अरबांच्या आक्रमणामुळे त्यांनी पादाक्रांत केलेल्या प्रदेशांतील भाषांमध्ये अरबीचे शब्द शिरले; पण अरबीत मात्र इतर भाषांतून फारसे शब्द आले नाहीत, असे घडले असावे! अरबी-फारसीचे काही शब्दकोश चाळल्यानंतर झालेले हे माझे मत आहे. ते बरोबर नसण्याचीही शक्यता आहे. अर्थात विद्वत्तेचे शिक्कामोर्तब - किंबहुना गंधही–नसलेल्या माझ्यासारख्या सामान्य लेखकाने मान्यताप्राप्त विद्वानांच्या मतांविषयी शंका घेणे हे फारच मोठे धार्ष्ट्य समजले जाईल. एका शब्दाचा पाठलाग करण्याच्या नादात ते धार्ष्ट्य मी केले आहे– जे मी जन्मभर करीत आलो आहे. जित्याची खोड मेल्याशिवाय जात नाही, हेच खरे!

**'गुलबकावली' ने दिलेला चकमा (चकवा!)**

एखादा शब्द मी-मी म्हणणाऱ्यांना कसा चकवितो, याचा अनुभव 'कंगाल' या शब्दाने तीन-चार वर्षांपूर्वी मला आला होता. त्यामध्ये मी स्वतः त्या चकव्यापासून अलिप्त होतो आणि इतरांची भुलवणी किंवा भुलावणी मजेत पाहत होतो. त्या वेळी आपणही केव्हा तरी या चकव्यात सापडणार आहोत, याची कल्पना मला नव्हती. तो अनुभव परवा (२६.२.९६) रोजी आला आणि गंमत वाटली. माझा बालमित्र कविवर्य वसंत बापट याने अनपेक्षितपणे फोन करून विचारले, 'गुलबकावली म्हणजे काय? ते एखाद्या फुलाचे नाव असल्यास ते कोणते फूल?' मी चक्रावलो. तो शब्द मी यापूर्वी अनेकदा ऐकला व वाचला होता. पण त्याचा मूळ अर्थ काय, तो कोठून आला, याची मला काहीच माहिती नव्हती. तशी माहिती घेण्याची कधी जरुरीच वाटली नव्हती. तरी पण त्यासंबंधी मनात जी काही धारणा किंवा कल्पना होती, ती वसंताला सांगणे जरूर होते. म्हणून मी म्हणालो, 'हा बहुधा फारसीचा शब्द असावा. एखाद्या काल्पनिक फुलाचे ते नाव असावे. एका अर्थाने ते मिथक (मिथ) असावे, असे वाटते. हिंदी-उर्दूचे अध्ययन करताना सुरुवातीच्या काळात गुलबकावलीची गोष्ट वाचल्याचे आठवते. तरी पण शब्दकोश पाहून तुला नक्की सांगतो.' त्याप्रमाणे अरबी-फारसीचे माझ्या संग्रहात असलेले शब्दकोश मी धुंडाळले. माझा स्वतःचा 'उर्दू मराठी शब्दकोश'ही पाहिला. पण कोठेच हा शब्द सापडला नाही. गुल (फूल) या फारसी

शब्दापासून बनलेले गुले अब्बास (गुलबक्षी), गुले अश्रफी (झेंडूचे फूल, गेंदा), गुले आफताब (सूर्यमुखी), गुले पिलास (पलाश-पुष्प), गुले मखमल (कोरांटी), गुले मेहंदी (मेंदीचे फूल), गुले यास्मिन (चमेली, मालती) यांसारखे अनेक शब्द मिळाले. पण गुलेबकावली असा शब्द आढळला नाही. तरी पण हा शब्द फारसीचाच असला पाहिजे, अशी माझी जी ठाम समजूत होती, ती काही बदलेना. महत्त्वाचे व प्रतिष्ठित उर्दू शब्दकोश हे फक्त अरबी, फारसी, तुर्की वगैरे परकीय भाषांतील शब्दांचेच संग्रह असतात. संस्कृतोद्‌भव हिंदी किंवा देशी शब्दांचा समावेश त्यांत नसतो. म्हणून अशा शब्दांचा समावेश असलेले 'फीरोजुल्लुगाते उर्दू' व 'सईदी डिक्शनरी' यांसारखे मुख्यतः शालेय विद्यार्थ्यांच्या उपयोगासाठी असणारे, सामान्य जनतेचे शब्दकोश धुंडाळले. त्यांमध्ये 'एक सफेद रंगका खुशबूदार फूल' व 'एक राजा की बेटी' असे अर्थ सापडले. हा शब्द 'गुलेबकावली' असा नसून 'गुलबकावली' असा आहे आणि तो अरबी-फारसीचा नसून 'उर्दूचा' म्हणजे हिंदीचा, अथवा स्थानिक भाषेचा आहे, असे त्यांनी नमूद केले आहे. त्यामुळे तो शब्द फारसीचा असल्याबद्दलची माझी समजूत डळमळली. तरी पण त्या भ्रमातून किंवा भुलाव्यातून बाहेर पडण्यास अजूनही माझे मन तयार होत नव्हते. म्हणून मी वसंत बापटला सांगितले, 'मला या शब्दाचे मूळ खात्रीलायकपणे सापडत नाही. तेव्हा याबाबतीत तू माझे स्नेही डॉ. इब्राहीम फैज यांच्याशी संपर्क साधून त्यांच्याकडून खात्री करून घे. डॉ. फैज हे फारसीचे विद्वान असून स्वतः उर्दूचे उत्कृष्ट कवी आहेत. त्यांनी पुण्याच्या वाडिया कॉलेजात फारसीचे प्राध्यापक म्हणून अनेक वर्षे काम केले आहे. तेव्हा याबाबतीत त्यांचा निर्णय अखेरचा मानण्यास हरकत नाही.' आणि मी त्याला फैज यांचा पत्ता व फोन-नंबर दिला.

मध्येच मला आठवले, की आधुनिक मराठी साहित्याच्या इतिहासात हरिभाऊ आपट्यांच्या कादंबऱ्या प्रकाशात येण्यापूर्वी गुलबकावली, मंजुघोषा, मुक्तामाला, विचित्रपुरी यांसारख्या अद्‌भुत कादंबऱ्यांनी मराठी रसिकांना रिझविण्याचे काम केले होते. सहजच मनात विचार आला, की 'महाराष्ट्र शब्दकोशा'त हा शब्द अवश्य असणार! परंतु त्या महाकोशातही तो शब्द सापडला नाही. वस्तुतः 'गुल' पासून बनणारे किमान ३२ शब्द या कोशाने दिले आहेत. पण 'गुलबकावली'ला मात्र त्यात स्थान मिळालेले नाही.

अखेर मनातल्या मनात स्वतःचा (किंबहुना स्वतःच्या समजुतीचा) पराभव मान्य करून, उर्दू-फारसी-अरबीच्या चक्रातून बाहेर पडून, इतर भाषांमध्ये शोध घेण्याचे मी ठरविले. त्याप्रमाणे प्रथम माझ्या स्वतःच्या 'बृहत् हिंदी-मराठी शब्दकोशा'त पाहिले. तर तेथे 'गुल' शब्दाच्या पोटात 'गुलबकावली' हा शब्द सापडला. त्याचा अर्थ 'बकावलीचे फूल (पांढरे व सुवासिक)' असा मी दिला आहे. पण त्या कोशात 'बकावली' हा शब्द मात्र नाही! हिंदीचा १९३९ साली प्रकाशित झालेला 'भाषा शब्दकोश' (सं.डॉ.रामशंकर शुक्ल, 'रसाल') प्रथम पाहिला. त्यात 'हलदकी जातिका

पौधा- जिसमें सुंदर सुगंधित फूल होते हैं' हा अर्थ दिलेला असून 'फा.गुल + सं.बकावली' अशी व्युत्पत्ती दिली आहे. परंतु आपटे यांच्या संस्कृत इंग्रजी शब्दकोशात (१८८९ ची पहिली आवृत्ती) 'बकावली' हा शब्द मिळाला नाही. 'बकुल' वरून 'बकावली' शब्द बनला असण्याची शक्यता दिसत नाही. 'बक + आवली' (बगळयांची पंक्ती किंवा रांग) यावरून तो बनला असण्याची शक्यता आहे.

या संदर्भात आणखी एक शक्यता नजरेआड करता येणार नाही. ती अशी, की वनवासी लोकांच्या भाषेत या फुलाचे नाव बकावलीशी मिळतेजुळते असेल आणि नागर लोकांनी त्याचे संस्कृतीकरण करून संस्कृत शब्दाशी मिळते जुळते रूप त्याला दिले असेल.

अखेर ज्ञानमंडल (बनारस) च्या 'बृहत् हिंदीकोशा'त हा शब्द मिळाला. त्यात त्याचा अर्थ 'अमर कंटक के जंगलोमें होनेवाला एक सफेद, सुगंधित फूल– जो आँखोके रोगों की अच्छी दवा बताया जाता है; उर्दूकी एक प्रसिद्ध कहानी और प्रबन्ध काव्य' असा दिला आहे.

यावरून बराचसा खुलासा झाला खरा; पण प्रत्यक्ष गुलबकावलीचे फूल पाहिल्याखेरीज मनाचे समाधान होणार नाही.

तरी पण अद्‌भुत कथा-कादंबऱ्यांत आढळणारे ते एक काल्पनिक फूल असावे, आणि ते इराणातून भारतात आले असावे (म्हणून तो शब्द फारसीचा असावा), असा जो समज झाला होता, तो दूर झाला, हेही नसे थोडके!

**श्रीरघुवंश, केतकर मार्ग, एरंडवणे, पुणे ४११००४.**

❑❑

---

**साक्षरता**

काय कामाच्या माझ्या कविता –
जर माझ्या आईला त्या वाचता येत नाहीत?

रशीद बुजेद्रा (अल्जीरियन कवि, जन्म १९४१, Pour ne plus rever ह्या फ्रेंच कवितासंग्रहातून)

# पुणे सोडताना - परतीचा प्रवास

– श्याम विमल

१) तयारी असावी, जाणार आहे ना
प्रवास खूप लांबचा आहे.

काय घेऊन जावं नि काय सोडावं
कपडे जरुरी आहेत... पेन, काही कागद, डायरी आणि पुस्तकं
सिगारेट-लायटर, पाण्याची बाटली आणि कॅमेरा
मित्रांची पत्रं आणि पत्नीची घरगुती पत्रं
मग स्वतःलाही न्यायचं आहे
मागे सोडायचं आहे चाळीस दिवस नि एक्के चाळीस रात्री
आठवणींच्या तारांवर लटकावून
अहोरात्र वाहत्या नदीला नमस्कार करत जाणार आहे

कोकिळेला खूप त्रास दिला
तिच्या सादेची नक्कल करत असू शिट्यांनी
त्याबद्दल क्षमा मागायची आहे
झाडांना धन्यवाद द्यायचे आहेत
खोलीचे आभार मानताना
येथील हवेत खोल श्वास भरून
घासलेल्या बुटांनी ह्या श्यामल शहरातून
  निघून जायचं आहे

तयारी असावी. प्रवास खूप लांबचा आहे.

२) खिडकीजवळ बसलोय्
भरून गेल्यात सगळया जागा माझ्याजवळच्या
आणि समोरच्या,





अनुक्रमणिका

गाडीतून बाहेर  जाणारे - पोहोचवणारे अनेक लोक आहेत
माझा कोण  आहे यांपैकी आत ना बाहेर
माझ्यासाठी कोण आहे हात उचलून निरोप देणारा
कोण आहे, रुमाल हलवणारा माझ्यासाठी
माझा कोण आहे यांपैकी माझ्यासाठी ज्याचे डोळे भिजावेत
हे म्हणणारा कोण असेल- 'पोहोचण्याची खबर लौकर द्यावी.'

तेव्हा पण प्लॅटफॉर्मवर माझे शोधणारे डोळे भटकत आहेत

गार्ड शिट्टी फुंकतो झेंडी हालवतो
इंजिनचा भोंगा चालण्याची तयारी दाखवतो
गाडी सरकू लागते.... माझ्या डोळ्यांना सापडलंय्
सुटत्या प्लॅटफॉर्मवर तोच फक्त तोच एक आहे
हात उचलून रुमाल हालवताना
त्याचे डोळे पाणावलेले आहेत. तो तिथेच राहणार आहे
तो मला निरोप द्यायला आला होता.
तो मीच होतो.

३) सुपरफास्ट ट्रेनमध्ये खिडकीजवळ बसलोय् मी
बघतोय् मी खाली-वर होणाऱ्या तारा
टेलिफोनच्या तारा
एका खांबावरून दुसऱ्या खांबापर्यंत
श्वास घेत-सोडत जाणाऱ्या तारा
माझ्या श्वासांशी मेळ बसणाऱ्या तारा

मी त्याच ट्रेनमध्ये बसलोय् जिचं
अखेरचं स्टेशन मला माहीत आहे
पण मी कोणत्याही रात्री मध्येच कुठे तरी उतरून जाईन
जिथे थांबायला सिग्नल
लाल डोळा दाखवत असेल, तिथेच
जवळपास काळोख असेल, काळोख...
दूर कुठे तरी मिणमिणत असेल थेंबभर ज्योती
तिथेच मी चालत जाईन

आणि ह्या ट्रेनमधून बसल्या-बसल्या
बघीन स्वतःला
जाताना त्या ज्योतीकडे
ज्योतीत मिसळण्यासाठी
सिग्नल झाल्यावर
ट्रेन पुन्हा सरकत जाईल...सरकत जाईल
तेव्हा पण मी खिडकीतून बाहेर बघत जात असेन
थेंबभर ज्योतीकडे......

खिडकी उघडी असणं अत्यंत आवश्यक आहे, म्हणून
ज्योतीत मिसळताना स्वतःला बघण्यासाठी

**'विमल-वाटिका', बी ९६, सेक्टर २६, नोएडा (उ.प्र.) २०१३०१**

(श्री. श्याम विमल हे हिंदी भाषक लेखक आणि कवी असून, काही काळ पुण्यात पश्चिम विभागीय भाषा केंद्र, डेक्कन कॉलेज येथे राहून मराठी भाषा शिकून गेले आहेत. त्यांच्या अनेक कविता यापूर्वी 'भाषा आणि जीवन'मध्ये प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यानंतर बराच मोठा खंड पडला, म्हणून हा पुनःपरिचय.

— संपादक.)

□□

---

**शब्दकोश आणि घड्याळ**

शब्दकोशांची स्थिती घड्याळांसारखी असते. हाताशी काहीच नसण्यापेक्षा निकृष्टातलं निकृष्ट बरं, आणि उत्कृष्टातलं उत्कृष्ट असलं तरी अगदी बरोबर चालण्याची अपेक्षा करणं चूक.

सॅम्युअल जॉन्सन (इंग्लिश कोशकार १७०९–१७८४)





अनुक्रमणिका

# एक भाषिक खेळ

– ऋचा गोडबोले

मी स्वतः गेली तीन वर्षं इथे जर्मनीत शिकते आहे. Internet वरून अमेरिकेतील मराठी विद्यार्थ्यांशी रोजचा संपर्क असतो आणि अशा दुहेरी चर्चेतून बरेचदा उद्भवणारा मुद्दा असा, की परदेशांत राहून मुलांना मराठीपण काय, ते कसं दाखवायचं? मुलांना 'सांस्कृतिक मराठी' कसं शिकवायचं? ह्यातल्या तत्त्वचर्चेत मी जात नाही, पण त्यावरून मला सुचलेला एक शैक्षणिक खेळ पुढीलप्रमाणे :

सोबतच्या द्विपदी वाचल्यावर वाचक प्रत्यक्ष अनुभवाच्या स्तरावर जातो. (जावा) एकूण उपलब्ध द्विपदींनुसार त्यांच्या अनुक्रमांकांसकट (१.०, २.०) चिठ्ठ्या करायच्या, फासा/फासे टाकून येणारी चिठ्ठी वाचून दाखवायची/समजावायची.

अगदी लहान मुलांना

b. चिठ्ठ्यांत काही शब्द गाळून (यमक ठेवून)

a. प्रमाणे (प्राथमिक/शाळा वयोगट)

c. चिठ्ठ्यांत फक्त यमकं द्यायची, विशिष्ट वेळात प्रत्येकाने त्याला संदर्भ पुरवून द्विपदी लिहायची, शेवटी मूळ + खेळाडूची दोन्ही द्विपदी (१.०, १.१) वाचायच्या, खेळात समाविष्ट करायच्या (इतर सर्वजण).

प्रत्येक स्वतंत्र द्विपदी वाचल्यावर गंध, चित्र, भाव असा बहुमाध्यमी (Multimedia) प्रकार तयार होतो (व्हावा.) त्या अनुषंगाने अनेक व्यक्तिगत आठवणी समोर येतात. मुलांना असल्या आत्मचरित्रांचा कंटाळा येत नाही, (कारण त्याच्यात 'आत्म' भाग कमी असतो.) त्यामुळे ती झाली, तर बोलकी होतात. ह्यातलं खेळाचं स्वरूप, त्याचा शैक्षणिक उपयोग हा कदाचित माझा कल्पनाविलास असेल, त्यामुळे द्विपदी लिहिण्याच्या सोप्या भागाची मी सुरुवात केली आहे. त्यात काव्यगुण सर्वथा अपेक्षित नाही, कोणीही ते करू शकतं.

१) वरणभाताची रास, वाफाळता घास<br>
बोटांना पिळलेल्या लिंबाचा वास





अनुक्रमणिका

२) कपाचा कान, बाटलीची मान
अडगळीच्या वासाचं जखमी सामान
३) फांद्यांत वारा, टेलिफोनच्या तारा
बागेतल्या चणेवाल्याचा खरपूस पेटारा
४) दुपारची गाणी, चहासाठी पाणी
कोपऱ्यात कुलकुलणारी भिजलेली चिमणी
५) कडीतली पुडी, अर्धीजळकी काडी
पाणी होऊन पेटणारी कापराची वडी
६) सायीचा गूळ, तांबडीकाळी धूळ
असं चोखल्यावर जिभेवर हुळहुळ
७) दुपारची शाळा, परीक्षेपूर्वीचा उन्हाळा
मधल्या सुट्टीत कोवळा ताडगोळा

Rva Godbole, 5a Spitzaker Str., 79100 Freiburg, Germany.

(ऋचा गोडबोले यांनी सुचविलेल्या या भाषिक खेळासंबंधी कोणाला काही शंका असल्यास त्यांनी त्यांच्या वरील पत्त्यावर संपर्क साधावा.

– संपादक)

❑❑

---

**एक संज्ञापन-कर्तव्य**

गोष्ट मला आवडली तेव्हा लेखकांना नाही तर प्रकाशकांना तसे कळवणे हे माझे कर्तव्य होते..... समाजात कोठलीही चांगली गोष्ट घडली तर तिची प्रशंसा करून ती दुसऱ्याच्या नजरेला आणणे हे प्रत्येक नागरिकाचे वस्तुतः एक कर्तव्यच म्हटले पाहिजे. एरवी ती गोष्ट इतरांना कशी माहित होणार व तिच्या कार्याला आपण योग्य मार्गावर आहो हे तरी कसे कळणार?

त्र्यं. शं. शेजवलकर, कथा-वाङ्मयातील एक उच्चांक, नवभारत नोव्हेंबर १९५५

**पुनर्भेट**

विंदा करंदीकर

'धृपद' पॉप्युलर, मुंबई.

अव्यय तें एक। सांडलें गा
अगा क्रियापदा। केव्हां येसी भेटी;
आयुष्यांत दाटी। कृद्वंतांची;
कालच्या कृतीला। आज ना वारस;
संतती औरस। संपली गा
नामांच्या घोषांत। सरे 'सर्व' नाम;
धर्म, अर्थ, काम। एक झाले
कर्माच्या पोटांत। स्वप्नाची ना कळ;
कर्ता अमंगळ। जन्मदाता
जन्मण्यापूर्वीच। ऐसे कैसे मेलों?
वैकुंठास गेलों। आत्यावीण
विशेषणें फक्त। माजली अनेक;
अव्यय तें एक। सांडलें गा
अगा क्रियापदा। तुझ्या हातीं अर्थ;
बाकी सारा व्यर्थ। शब्दव्यूह

**विं. दा. करंदीकर**

**ककारदी योग**

भाषा आणि जीवन हिवाळा १९९२ च्या मुखपृष्ठावर 'काकाने काकूला' इत्यादी कने सुरूवात होणाऱ्या शब्दांचे गंमतीचे वाक्य टाकले आहे. ते वाचून लहानपणी बडोद्याला गुजरातीतल्या तशाच प्रकारच्या एका वाक्याची आठवण झाली. मात्र त्यात शब्दांची संख्या जरा कमी आहे. वाक्य असे :

काकाए काकीने कह्युं के काचना कपाटमांथी कांदो काळी कचुंबरी करो.

प्रेषक : म. अ. मेहेंदळे

(गुजराती वाक्य मराठी वाक्याइतके हिंसक नाही हेही वाचकांच्या लक्षात यावे! माणूस भाषा वापरतो त्याप्रमाणे भाषेशी खेळतोही ('भाषेशी खेळणे', भाषा आणि जीवन, पावसाळा १९८८, संपादकीय). ही भाषिक क्रीडा लोकसंस्कृतीचा एकभागच असते. मराठी आणि गुजराती यांच्यामधील या दोन वाक्यांमधले साम्य लोकसंस्कृतीच्या अभ्यासकांनी नोंदवले असेलच. बर्नर्ड शॉच्या पिग्मेलियन (मराठी रूपांतर, पु ल. देशपांडे यांचे फुलराणी) या नाटकात अशा वाक्यांचा उपयोग प्रोफेसर हिगिन्ज उच्चार शिकवताना सरावासाठी करून घेतो असे दाखवले आहे. - संपादक)

# ग्राम्यतेतील सामर्थ्याच्या निमित्ताने

राजाभाऊ गवांदे

श्री. श्रीपाद जोशींचा लेख 'ग्राम्यतेतील सामर्थ्य', ७१/भाषा-आणि जीवन, ११:३ /पावसाळा, १९९३ तसेच श्री. यशवंत कानिटकरांची प्रतिक्रिया 'ग्राम्यतेतील सामर्थ्य ?', भाषा आणि जीवन, १२:४/दिवाळी, १९९४ वाचून माझ्या मनात काही विचार आले, ते असे :

भाषा आणि जीवन यांचा अतूट संबंध आहे.

शंकराच्या डमरूतून ध्वनी निघाले, ही एक भाकडकथा होय, असे मानणारा एक वर्ग आहे. बोलणे (भाषा) म्हणजे विकार, विचार, वस्तू व क्रिया ह्यांचे प्रदर्शन मुखातील ध्वनींनी (वर्णमालेच्या साहाय्याने) करणे. ध्वनीपासून भाषा असा क्रम मानला आहे. ज्यांना भाकडकथा म्हणून एका अर्थाने हिणवले जाते, त्या कथा ह्या पुरा (पुराण) कथा म्हणून ओळखल्या जातात. परंपरेने लोकमानसात वर उल्लेख केलेली पुराकथा नांदत आहे. लोकांनी अर्थात खुणांनी मागणी केल्यावर भगवान शंकराने डमरू वाजविला आणि पावसाच्या सरींसारखी वर्णमाला उभ्याने खाली अवतरली. ऋषींनी ती भूर्जपत्रावर आडवी मांडली. शंकराच्या भाळी जी चंद्रकोर आहे, ती उलटसुलट खेटून चितारली, म्हणजे डमरूचा आकार सिद्ध होतो. डमरू एकदा इकडून, तर एकदा तिकडून वाजतो. म्हणजेच डमरू अखंड वाजत नाही. हेच दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे, म्हणजे डमरू वाजतो; थांबतो, त्याप्रमाणे आपण बोलतो, तेव्हा एक शब्द मरतो; दुसरा शब्द जन्माला येतो. म्हणून डमरूचे वाजणे हे जणू भाषेच्या रचनेवरील रूपक होय. हे असे असले, तरी भाषेत आपणांस एका सातत्याचा प्रत्यय येतो. कारण ही क्रिया अखंड चालू असते/राहते. जीवन याहून वेगळे नाही. जगणे, मरणे; जगणे, मरणे हा क्रम नित्य चालूच असतो. मरण शरीरातच असते, जसे जीवन शरीरात असते. आता शंकर डमरू कधी वाजवतो ? तर प्रलयाच्या वेळी. प्रलय म्हणजे मृत्यू; पण मृत्यूने सारे संपत नाही. प्रलयापाठोपाठ पुनः प्रारंभ – म्हणजेच प्रलय/प्रारंभ अशी ही साखळी; आणि त्यामुळे डमरूचे वाजणे हे जीवनमरणाचे तसेच भाषारचनेचे रूपक होय. तेव्हा लोकमानसातील ही कथा म्हणजे निव्वळ भाकडकथा नव्हे. खरे तर, असे आहे, की आमच्या पुराकथांमधून मानवी प्रज्ञेचे, प्रतिभेचे दर्शन घडते.

आपण बोलतो, म्हणजे (वर्णमाला, स्वर, व्यंजने) अक्षरे, शब्द आणि नंतर वाक्य

असा वाचिक प्रवास करतो. याहून जास्त यथार्थ सांगावयाचे म्हणजे, आपण बोलतो, म्हणजे एकामागून एक असे विचार मांडतो. प्रत्येक पुऱ्या अर्थाच्या विचाराला वाक्य असे म्हणतात. आपल्याला जे म्हणायचे असते, तेच आपण अक्षरांच्या खुणांनी कागदावर लिहून दाखवतो. तेव्हा बोलण्यासाठी, तसेच, लिहिण्यासाठी शब्दांचा वापर करावा लागतो. आता ह्या शब्दांची मोठी मौज असते. मौज अशासाठी, की शब्दांच्या संग्रहात सदैव वाढ होत असते. जुने शब्द नेहमीच्या वापराने झिजतात व गुळगुळीत होतात. ते पाहिजे तेवढा परिणाम करीत नाहीत, असे अनुभवाला आले, की आपण नवीन शब्द घडवतो. दुसरे असे, की सुटा शब्द शबल असतो. संदर्भामुळे त्याला अर्थ व सामर्थ्य प्राप्त होते. खेरीज बाजारपेठ बदलली, की शब्दांचा अर्थही बदलू शकतो. उदाहरण म्हणून आपण 'भावना' हा शब्द घेऊ. आईला तिच्या मुलाबद्दल वाटणारी वात्सल्याची भावना, प्रेयसीला प्रियकराबद्दल वाटणारी प्रेमभावना, वैद्याने केलेल्या निदानातील रोगाची – म्हणजे जसे : राजयक्ष्म्याची भावना आणि औषधाला दिलेली चांदण्याची भावना - या सर्वांमधील 'भावना' शब्द समान असला, तरी त्या शब्दाचा अर्थ सर्वत्र समान नाही.

वरील पार्श्वभूमीवर शब्दांच्या संदर्भात काही विचार करता येणे शक्य आहे. प्रथम हे लक्षात घेतले पाहिजे, की शब्द प्रथम येतात व शब्दांची वर्गवारी नंतर होते. काळाच्या ओघात कधी तरी अशी वर्गवारी घडली, तेव्हा 'विधी' व 'निषेध' असे दोन शब्द वर्गवारीचे द्योतक झाले; किंवा 'विधी' व 'निषेध' या दोन संकल्पना पुढे आल्या आणि त्यांनी लोकमानसावर फार काळ अंमल गाजविला. करावे, असे जे, ते 'विधी'त, तर करू नये, असे जे, ते 'निषेधा'त मोडू लागले. त्याचप्रमाणे बोलावे, असे जे, ते 'विधी'त, तर बोलू नये, असे जे, ते 'निषेधा'त मांडले जाऊ लागले. भट हा शब्द 'विधी'त, तर भटुरडा हा शब्द 'निषेधा'त. व्यक्ती तीच, पण तिच्या संदर्भात तुम्ही काय बोलता, यावरून ही वर्गवारी ठरू लागली. विधिनिषेध हा संयुक्त शब्द पुढे वापरून गुळगुळीत झाला. 'त्याला त्याचा काही एक विधिनिषेध नाही', असे म्हणताना आता फारसे ऐकू येत नाही.

परंतु या 'विधी'तूनच व्रते आलीत. व्रतांची सांगता शिव्यांनी केली जाई. प्रत्यक्ष संभोग नसला, तरी संभोग सूचित होईल, असे शब्द वापरणे आले. व्रतबद्धतेत संभोग संभवत नाही. त्यानंतर मात्र परवानगी. यातून शिवी जन्माला आली, अशी एक विचारसरणी आहे.

विवाहाचा विधी घ्या. ब्रह्मदेव म्हणजे प्रजापती. यात प्रजा शब्द आहे आणि प्रजा शब्दाचा विचार विवाह या शब्दाबरोबर ओघाने येतो. तेव्हा विवाहसमारंभात प्रजापतीचा आदर तर केला पाहिजे; परंतु तो स्वकन्येशी लागू. तेव्हा त्याच्या निषेधाच्या निमित्ताने 'ब्रह्मोद्ये' किंवा 'कूटे' निघाली. प्रजापतीचे 'अगुणवर्णनम्' महत्त्वाचे ठरले. लग्नातील शिव्यांची प्रथा व विचकट उखाणे यातून निघाले. अशीही एक विचारसरणी

आहे.

शिमग्यातील शिव्या आणि व्याहीविहिणींच्या उखाण्यांतून फाजील, चावट बोलणे ही वरील संदर्भातील उदाहरणे होत.

सभेमध्ये ज्याचा उच्चार करावयास कोणतीही हरकत नाही, तो अर्थ सभ्य; आणि ज्याचा सभेमध्ये उच्चार करणे अशक्य असते, तो अर्थ असभ्य, असे नमिसाधूचे विवेचन आहे. शब्द हा स्वभावतः म्हणजे मुळात ग्राम्य नसतो, तर विषयाच्या अनुरोधाने तो ग्राम्य ठरतो, असेही नमिसाधूचे विवेचन आहे.

ग्राम्य शब्दांऐवजी इतर पर्याय-शब्द वापरून तोच आशय व्यक्त करण्याची प्रतिष्ठितांची रीत असते. शौचास जाणे, लघ्वी करणे, वारा सरणे असे शब्द न वापरता हगणे, मुतणे, पादणे असे शब्द वापरले, तर ते ग्राम्य ठरतील, ही समजूत. ही समजूत कितीशी बरोबर? आणि ती बरोबर, की चूक, हे कोणी ठरवायचे? रडणाऱ्या मुलाला 'स्तन' दे, असे कोणी म्हणत नाही. 'त्याला पाज' असे म्हणतील आणि हे म्हणण्यात एका सोपीकरणाचा अनुभव येतो. परंतु 'पोराला थान दे' असा शब्दप्रयोग अजूनही वापरात आहे. त्याचा वापर कमी असेल. पण 'स्तन' शब्द सभ्य आणि 'थान' शब्द ग्राम्य, असे म्हणण्यात मला एक मानसिक रुग्णतेचा प्रत्यय येतो. मर्ढेकरांवर अश्लीलतेवरून खटला भरला गेला आणि तो 'काही कवितां'बाबत होता. 'विश्रांति-स्तन कोठे घ्यायचा' ही एक आक्षिप्त ओळ होती. मर्ढेकरांच्या बाजूने न्यायालयात आचार्य स.ज. भागवतांनी साक्ष दिली होती. आक्षिप्त ओळीच्या संदर्भात बोलताना आचार्यांनी 'स्तन देणे', 'स्तन घेणे' या प्रयोगातील वात्सल्य, सुरक्षितता आणि उबदार आधार या भावांची महत्ता विशद केली आणि ते आवेशाने म्हणाले, 'न्यायाधीश महाराज, 'स्तन घेणे' हा शब्दप्रयोग जर अश्लील असेल, तर आपण अश्लील आहात, हे वकील अश्लील आहेत, इथे बसलेला प्रत्येक माणूस अश्लील आहे, मी अश्लील आहे, कारण आपण सारे आपापल्या मातेच्या स्तन्यावरच जगलो व पोसलो आहोत.' म्हणजे गंमत पाहा. स्तन हा संस्कृत शब्दही सरकारी पक्षाला अश्लील वाटला होता. मग 'थान' किंवा 'आमा' ह्या शब्दांचे काय? मोरोपंतांची प्रसिद्ध आर्या अशी आहे :

'पसरूनिया आ, म्यांचि स्वांबेच्या सेविली सुधा आम्याची.'

सानेगुरुजी विद्यार्थी होते, त्या काळात त्यांनी लोकमान्यांचे एक भाषण ऐकले. त्या संदर्भात त्यांनी एके ठिकाणी लिहिले आहे,' लोकमान्य बोलत होते आणि मी पीत होतो.' हे लिहिण्यात, लोकमान्यांचे विचार त्यांना स्तन्यस्वरूप वाटले, असे सांगावयाचे होते.

पूर्वी विटाळ पाळीत. तेव्हा चांगल्या प्रतिष्ठित कुटुंबात सुद्धा 'तिला लागायचे नाही' असा शब्दप्रयोग करीत. आणि त्या वेळच्या लग्नपत्रिकेत 'शरीरसंबंध रा.रा. ह्यांची कन्या-वधू म्हणून नेमस्त केली असे', असा शब्दप्रयोग असे आणि तो कोणालाही खटकत नसे.

एक समजूत अशी, की विशिष्ट आशय व्यक्त करण्यासाठी स्वभाषेतील शब्दांचा वापर न करता तोच आशय परभाषेतील शब्दांनी व्यक्त केला, म्हणजे अश्लीलता, असभ्यता, ग्राम्यता दूर जाते. संभोगासाठी 'इंटरकोर्स', विटाळशीपणासाठी 'पीरियड' असे शब्द वापरण्यात संकोच वाटत नाही. परभाषेतील शब्दांचा वापर केवळ श्लील, अश्लील, ग्राम्य, सभ्य अशा निकषांवर अवलंबून नसतो. त्या वापराची अन्य कारणेही आहेत. वास्तव असे आहे, की परभाषेतील काही शब्द आपल्या भाषेत पाहुणे म्हणून येतात आणि काही काळाने घरचेच होतात. पुरुषेंद्रियाला संस्कृतातील शिस्न किंवा इंग्रजीतील पीनिस शब्द वापरल्याने खरोखरीच तथाकथित अश्लीलता / ग्राम्यता दूर जाते का ? घरातील सर्वांना जेव्हा संस्कृत व / वा इंग्रजी भाषा येत असते, तेव्हा वरील शब्दांच्या संदर्भात संरक्षणाची कवचकुंडले गळून पडत नाहीत का ?

अश्लीलतेच्या खटल्यातील ('रंभा' मासिकातील काकोडकर यांच्या 'श्यामा' कादंबरीवरील) निकालपत्र देताना मला शब्दांच्या म्हणजे त्यातून सूचित होणाऱ्या आशयाच्या वर्गवारीचा Categorization विचार करण्याचा प्रसंग आला होता. आणि त्या संदर्भात मी CRIO असे सूत्र वापरले होते. यातील C म्हणजे Chaste = सभ्य; R म्हणजे Ribald = पाचकट, फाजील; I म्हणजे Indecent = असभ्य आणि O म्हणजे Obscene = अश्लील असा या सूत्राचा अर्थ होता.

सभ्य शब्दांबाबत फारसे लिहावयास नको. सभ्य शब्द वादाचा विषय होत नसतात; आणि सर्वसामान्यपणे लोक ज्या शब्दांबाबत वाद होणार नाहीत, आक्षेप येणार नाहीत, असेच शब्द वापरून भाषाव्यवहार करीत असतात. कारणपरत्वे, प्रसंग पाहून व आपण ज्यांच्याशी व/वा ज्यांच्या समोर बोलत आहोत, त्या लोकांचा स्तर पाहून थोडे-फार पाचकळ, फाजीलही बोलले जाते. हे बोलणे म्हणजे मन मोकळे करणे असते. यात काही करमणुकीचा भाग असतो आणि काही चावटणुकीचाही भाग असतो. ज्याला इंग्रजीतला शब्दप्रयोग वापरून अलीकडे 'नॉन्व्हेज् जोक्स' म्हणतात, असे बोलणे या सदरात येते. रिबाल्ड्रीबद्दलचे आकर्षण फार जुने आहे. शिमग्यातल्या शिव्या, विवाहप्रसंगीचे फाजील बोलणे आणि लष्करातील लोकांच्या– यांत अधिकारी आणि सैनिक दोघेही आले, गप्पांमध्ये येणाऱ्या कथा 'आर्मी जोक्स' या सदराखालीच मोडतात. असभ्य आणि अश्लील यांतील फरक कसा ओळखायचा, हा महत्त्वाचा प्रश्न आहे. या प्रश्नाच्या उत्तरात असे म्हणता येईल, की असभ्य शब्दरचना, फार तर, वाचकाला धक्का देईल आणि त्याच्या मनात त्या मजकुराबद्दल तिरस्कार निर्माण करील. उलटपक्षी, अश्लील शब्दरचना वाचकाची नैतिक प्रतिकारक्षमता खच्ची करील आणि त्याला भ्रष्ट विचाराचा आणि भावनेचा मोह घालील. ओंगळ, घाणेरडे आणि सदभिरुचीस सोडून असलेले लिखाण आणि अश्लील लिखाण यांतही फरक करावा लागेल. याप्रमाणे आशयाच्या संदर्भात शब्दांच्या वर्गवारीचा विचार करून मी असे





अनुक्रमणिका

म्हटले होते, की अश्लील लिखाणात साहित्यगुणांचा अभाव असतो व मनाचा अध:पात घडविण्याचे दुष्ट सामर्थ्य त्यात असते. जे अश्लील असते, ते वाङ्मय असूच शकत नाही. कारण वाङ्मयाने मनाचे उदात्तीकरण होते. अश्लील लिखाणाने मात्र अध:पातच होतो आणि म्हणून ते दंडार्ह ठरविले आहे. असाहित्यिक, वेश्यात्मक लिखाणात लिंगसूचक किंवा शिव्यांचे शब्द जेव्हा वापरले जातात, तेव्हा ते विकारांना भडकविणारे असतात.

शिव्यांच्या संदर्भात आता पुनः सुरुवातीस उल्लेख केलेल्या 'विधी' व 'निषेध' या संकल्पनांना समोर ठेवून काही विवेचन करू या. ब्रह्मदेवाचा स्वकन्येशी संबंध हा निषेधार्ह मानला गेला. यमाची बहीण यमी. तिला भावाशी संग हवा होता. तो यमाने नाकारला. पूर्वी असे संबंध असत, हे तिचे म्हणणे होते. परंतु आता तसे संबंध निषिद्ध मानले असल्याचे यम तिला सांगतो. एका अर्थाने तो तिच्याशी यमनियमांची गोष्ट बोलतो. तेव्हा ज्या संदर्भात 'निषेध' स्पष्ट आहे, तो दर्शवून शिवी दिली जाते– जशी आईबहिणीवरून. दुसरे असे, की शिवीमध्ये पावित्र्यविडंबनाचाही हेतू असतो. आपला जन्म आईच्या योनीतून होतो. तेव्हा ते ठिकाण हे आपले मातृस्थान आणि म्हणून आपल्या दृष्टीने ते पवित्र ठिकाणही. आपल्या मनात हा जो पावित्र्याचा विचार असतो, त्या पावित्र्याचे विडंबन करण्याच्या हेतूने त्या स्थानाचा उल्लेख करून शिवी दिली जाते. हे विवेचन म्हणून ठीक. परंतु प्रत्यक्षात शिवी दिली जाते, ती आपला तुच्छतेचा, रागाचा, संतापाचा वा नापसंतीचा विकार, ज्याला शिवी द्यायची, त्याच्यापर्यंत झटक्यात पोचावा, म्हणूनच दिली जाते. म्हणजेच शिवीही लागली पाहिजे. त्याचप्रमाणे माणसाचे ज्ञानतंतू जेव्हा खूप आवळले जातात, तेव्हा काही काळ का होईना, ते शिथिल होतील, अशा साधनाची त्याला गरज भासू लागते आणि मग शिवी किंवा तिची शब्दभगिनी शोभेल, अशी ग्राम्यता वापरून माणूस ती गरज भागवण्याचा प्रयत्न करताना दिसतो. शिव्यांचा ग्राम्यतेचा व्यवहार हा असा चालत आला आहे; आणि जरी काही सुधारित आवृत्त्या निघाल्या, तरी तो पुढेही असाच चालत राहील.

(संदर्भ १, मौज, दिवाळी, १९९३; 'आठवणीतले मर्ढेकर' ले. श्री. पु. भागवत पृ. ७३.)

**बी/५, अर्हत्, राममारुती रोड, ठाणे ४००६०२**

❐❐

# वेळ वाया घालवण्याचा प्रकार

स.न.,

श्री. मनोहर राईलकर यांचा 'हिवाळा ,९५' च्या अंकातील 'गण, गणवृत्त.....संगणक' हा लेख वाचून मनात काही शंका उभ्या राहिल्या.

१) संगणकाचा नक्की काय उपयोग अपेक्षित आहे, हे या लेखातून स्पष्ट झालेले नाही.

विविध अक्षरी किती वृत्ते संगणकाच्या मदतीने कळतील, याचे आकडे बरोबर असल्यास प्रचंड मोठे आहेत. गणितातील infinity चा आधार घेऊन म्हणता येईल, की अनंत शक्यता आहेत. पण त्या सर्व रचनांना आपण वृत्त म्हणून मान्यता देणार आहोत का?

उदा., सहा अक्षरी ००० ००० (१)
००० ००१ (२)
१११ १११ (३) इ. सर्व

रचनांना आपण सहा अक्षरी वृत्ते मानणार का? की आपण सर्व अनंत शक्यता विचारात घेऊन, त्यांपैकी वृत्ते कोणती? हे ठरवण्याचे काम संगणकाकडून करून घेणार?

संगणकाने एखाद्या रचनेचे फक्त द्विचिन्ह रूप द्यायचे, एवढाच उपयोग होणार असेल, तर याचा अर्थ आपण संगणकाचा बहुमूल्य वेळ वाया घालवणार आहोत. आधीच आपल्याकडे संगणक अयोग्य पद्धतीने वापरले जात असल्यामुळे तज्ज्ञ मंडळी सचिंत आहेत. तेव्हा हा उद्योग परवडणाराही नाही.

२) संगणकाला विशिष्ट भाषांमधील आज्ञावलीद्वारे माहिती पुरवावी लागते. या भाषांना आणि सर्वसाधारण संगणकाच्या स्मरणशक्तीला ('मेमरी') काही मर्यादा आहेत.

उदा., या बहुतेक भाषांमधून, किती अंकी पूर्णांकसंख्या (Integers) संगणकाला समजावता येतात, यावर मर्यादा पडते. जसे, 'C' मध्ये जास्तीत जास्त मोठा पूर्णांक हा ± ३२७६७ असू शकतो. 'D base' सारख्या Package मध्ये जास्तीत जास्त मोठी पूर्णांक संख्या १९ अंकीच असू शकते. यापेक्षा मोठी संख्या

पुरवण्यासाठी शास्त्रीय परिभाषा वापरावी लागते.

उदा., १९४६०९ हा अंक १.९४६०९ × १०⁵ अशा पद्धतीने पुरवावा लागतो.

त्यामुळे श्री.राईलकरांना अपेक्षित असलेली आकडेमोड सर्वसाधारण संगणक सहजगत्या करू शकणार नाहीत. त्यात घोटाळे होऊ शकतात.

३) संगणकाला पुरविलेल्या सर्व अंकांचे द्विचिन्ह पद्धतीने रूपांतर होत असले, तरी त्यांचे पुन्हा दशमान पद्धतीत रूपांतर होऊनच आपल्याला उत्तर मिळते. संगणक त्याच्या आकडेमोडीसाठी ५११ चे रूपांतर १११ १११ १११ असे करून घेत असला, तरी आपल्यासमोर ते येणार नाही. ते दशमान पद्धतीत येऊनच मिळणार. संगणकाने द्विचिन्ह पद्धतीतले रूप द्यावे, यासाठी तयार प्रोग्रॅम नसतो. त्यासाठी मुद्दाम तो तयार करणेच भाग पडेल.

श्री. मनोहर राईलकरांच्या लेखासंदर्भात वरील प्रश्नांची उत्तरे शोधणे आवश्यक वाटते.

**रत्नावली ना. टिळक, ५, शांतिसदन, सी.बी.एस्.जवळ, जुना आग्रारस्ता, नासिक ४२२००२.**

## अव्यवहार्य विचार

स.न.,

श्री. मनोहर राईलकर यांचा लेखाचा पहिल्या वाचनात बराच प्रभाव पडला; परंतु विचारांती जाणवलेल्या काही गोष्टी पुढीलप्रमाणे

१.१) 'गणवृत्तरचना' या घटनेस फक्त 'गणिती शक्यता' एवढे एकच अंग नाही. भाषिक शक्यता, काव्यात्मक शक्यता व पूर्वीची मौखिक परंपरा लक्षात घेतली, तर सांगीतिक शक्यताही तिच्यातून प्रत्यक्षात अवतरत असतात. गणिती शक्यतांखेरीज उपर्युक्त तिन्ही शक्यतांची केवळ तर्कशास्त्रीय अशी मांडणी असंभव आहे.

१.२) या परिस्थितीमुळे वृत्तप्रकारांना भाषा, संस्कृती, साहित्य व कलाव्यवहार यांमधील संकेत व प्रवाहपरंपरेचे एक कोंदण लाभत असते. त्यामुळे गणवृत्तांबद्दलच्या गणिती शक्यता कितीही असल्या, तरीही वरील इतर अंगांचे पाठबळ असल्याखेरीज त्यांना 'वृत्ते' म्हणून मान्यता मिळणे कठीण आहे.

उदा., तर्कदृष्ट्या सर्व अक्षरे ऱ्हस्व असणारी २७ अक्षरी रचना शक्य असली, तरी सामान्यतः ऱ्हस्वदीर्घांची एकाआड एक गुंफण करीत व्यवहार करणाऱ्या मराठी भाषेच्या प्रकृतीस ती सहजसाध्य नाही. एखाद्या कवीने हे 'आव्हान' स्वीकारलेच, तरी त्यातून निर्माण होईल, ते 'काव्य' असेलच, असे नाही. ही 'कविता' सहजपणे लयीत म्हणता यावी, ही अपेक्षा पुरी होणे, त्याहून अवघड!

पंडिती काव्यातील सारीच वृत्ते लोकप्रिय झाली नाहीत, याचे हेच कारण आहे.

१.३) दुसऱ्या बाजूने पाहिले, तर वरील तिन्ही शक्यतांचा माणसाच्या

निर्मितिशीलतेशी संबंध आहे. ही निर्मितिशीलता वा प्रतिभाशक्ती तर्कशास्त्रीय नियम पाळण्याऐवजी अनेकदा धुडकावीतच असते. म्हणूनच कित्येकदा 'नियमितते' पेक्षा 'अनपेक्षितता' महत्त्वाची ठरते. गणिती सूत्रे अशा शक्यतांबद्दल अंदाज वर्तवण्यास असमर्थ असतात.

२) आजचे मराठी काव्य क्षेत्रातील वातावरण पाहता, बहुसंख्य कवींना गद्याचेच माध्यम स्वाभाविक वाटते, तर गीतकारांना मात्रावृत्ते जवळची वाटतात. अशा परिस्थितीत जी वृत्ते परंपरेत घट्ट रुजलेली आहेत, त्यांचाच वापर होण्याची शक्यता थोडी-फार दिसते. त्यामुळे ज्ञात- अज्ञात सर्व वृत्तांना गवसणी घालत बसण्याची फारशी आवश्यकता दिसत नाही. हा प्रयोग केला, तरीही मध्ययुगीन कवितेच्या अभ्यासाव्यतिरिक्त त्याचा उपयोग होण्याची शक्यता कमी.

या सर्व गोष्टींमुळे श्री.राईलकर यांचा विचार नवा व आकर्षक वाटला, तरी व्यवहार्य वाटत नाही.

**विद्यागौरी टिळक, ७/३०, महेश सोसायटी, बिबवेवाडी - पुणे ४११०३७.**

## भाषाभाषांतील उच्चारण - संकेत

'भाषा आणि जीवन' च्या दिवाळी, १९९४ च्या अंकात नीलिमा गुंडी यांच्या 'बोलू, तैसे लिहू' ह्या शीर्षकाचा लेख वाचला. (पृष्ठ ५३) ह्या लेखामागे त्यांचा काही वेगळा दृष्टिकोन असेल, पण मला वाटते, त्या म्हणतात, हा प्रकार केवळ मराठीपुरताच नसावा. सर्वच भाषांत असावा. निदान मला ज्या भाषांची ओळख आहे, तिथे तरी हा प्रकार आहे, असे मला जाणवते.

निरनिराळया कारणांनी माझा पुष्कळ भाषांशी परिचय झाला. मराठी आणि इंग्रजीबद्दल सांगण्याचे कारणच नाही. कॉलेजात शिकत असतानाच्या काळात, माझा एक मित्र बदलून कलकत्त्यास गेला होता. त्याच्यामुळे बंगाली भाषेशी ओळख झाली. मुंबईत शैक्षणिक आयुष्य गेल्यामुळे गुजराती आणि हिंदी, आमच्या शाखेत (रा. स्व. संघाच्या) १९४७ नंतर आलेल्या सिंधी मुलांमुळे सिंधी, (आता मात्र ती बहुतेक सारी विसरलो). गणितातील संशोधनाच्या उद्देशाने फ्रेंच आणि जर्मन, एक वर्ष पंजाबात (चंदीगड येथे) राहण्याची संधी मिळाली, तेव्हा पंजाबी आणि हौस म्हणून उर्दू, अशा अनेक भाषांशी संपर्क झाला. या सगळयाच भाषा मला चांगल्या येतात, असा माझा मुळीच दावा नाही. खरे तर, आता मराठी, इंग्रजी आणि हिंदी या तीन भाषांव्यतिरिक्त इतर भाषा फारशा चांगल्या येत नाहीत. पण ज्या काही भाषांशी संपर्क आला, त्या भाषांची मोडणी समजली आणि त्यांच्यापुरता तरी मला असाच प्रकार आढळला. नमुन्यादाखल काही उदाहरणे देतो. प्रत्येक भाषेतील थोडी थोडी उदाहरणे दिली, तरी मुद्दा स्पष्ट होईल.





अनुक्रमणिका

**मराठी :** खरे तर, मराठी ही आपल्या सर्वांच्याच परिचयाची आहे. त्यामुळे उदाहरणे देण्याची आवश्यकता भासू नये; आणि श्रीमती गुंडींनी ती दिलीच आहेत.

**बंगाली :** लिहायचे स, व, य, क्ष आणि वाचायचे श, ब, ज, क्ख. 'अ' चा उच्चार बहुतेक सर्वत्र ओ करायचा. सकल नव्हे शोकोल. वंदे चा उच्चार बोंदे. यति नव्हे जोति. परीक्षा नव्हे पोरीक्खा. लिहायचे विद्या, आणि वाचायचे विद्दा. कारण जोडाक्षरातील दुसरे अक्षर य, व (म्हणजे ब), किंवा म आले, तर ह्यांचा लोप होतो आणि आधीच्याच अक्षराचे द्वित्व होते. 'वाक्य' चा उच्चार बाक्को, 'अश्व' चा उच्चार ओश्शो, 'चिन्मय' चे वाचन चिन्नोयो. (ह्या 'य'च्या खाली नुक्ता असतो. त्याचा उच्चार मात्र 'य' च करायचा.)

**हिंदी:** लिहायचे पहला, कहला, बहना, इ. आणि वाचायचे पॅहला, कॅहना, बॅहना, इ. लिहायचे बैंक, पैसा , कैसा आणि वाचायचे बॅंक, पॅयसा, कॅयसा, इ. वह आणि यह ह्यांचे उच्चार वो आणि ये असे करायचे. स्कूल चे वाचन इस्कूल, वगैरे तर आपल्याला परिचितच आहेत. बंगालीप्रमाणे हिंदीतही कधी कधी 'ब' चा व होत असावा. म्हणून तर, 'यह बात मेरी बस मे नहीं' या वाक्यात 'वश' चा बस झाला असावा आणि बंगालीच्या उलट 'श' चा स होतो, ते वेगळेच. 'शशी' ऐवजी ससी.

**पंजाबी:** भारत, भ्रा (भाऊ), भेनजी (बहनजी), धरती हे शब्द पारत, प्रा, पेनजी, तरती, असे उच्चारायचे. म्हणजे महाप्राणाचा उच्चार नाही. भ्रा वगैरे अपवाद सोडले, तर पंजाबीत जोडाक्षरे नाहीत. त्यामुळे शत्रुघ्न हा शब्द शत्रुघन, प्रसाद हा शब्द परशाद (म्हणजे 'स' चा श), स्कूल ऐवजी सकूल, स्टोर ऐवजी सटोर, इत्यादी लेखन करावे लागते. आणि आता ते इतके रुळले आहेत, की त्यांचे वाचनही तसेच होते.

येथे एक चुटका सांगायचा मोह होतो. एक हिंदी इसम पंजाबी माणसांच्या उच्चारांवर टीका करताना म्हणाला,

'ये पंजाबीवाले कैसे बोलते हैं, देखो न। सकूल बोलते हैं। वास्तव में अस्कूल बोलना चाहिये।'

**उर्दू :** लिहायचे गालिबा आणि वाचायचे गालिबन्, मुस्तफे' चे वाचन मुस्तफा, लिहायचे बालकुल आणि वाचायचे बिलकुल.

**गुजराती :** ह्या भाषेतील लोक नेहमी श चा उच्चार स असा करतात. हेही बंगालीच्या उलट आहे, की नाही ?

**फ्रेंच :** उच्चाराच्या बाबतीत ही भाषा खूपच नियमित आहे. पण शेवटच्या व्यंजनांचा उच्चारच करायचा नाही. h चाही उच्चार होत नाही. herbe (गवत) चे वाचन एर्ब. शेवटच्या n चा उच्चार नाकातून करायचा. (n नंतर एखाद व्यंजन असले, तरी) काही अपवाद आहेत. उदाहरणार्थ, iL (तो) चा उच्चार ईल. par (एक उपपद) चा उच्चार पाऽर. car चा काऽर. jour (दिवस) चा जूर. शेवटच्या L आणि r यांचा उच्चार होतो. पुष्कळदा r चा उच्चार ऐकू येईल, न येईल, इतपतच करतात.

कधी कधी तर मुळीच होत नाही. उदा., heler (दाट किंवा तपकिरी रंगाने रंगवणे) चे वाचन आऽले. petit उच्चार पेति. pendant (गळ्यातलं पेंडं) चा उच्चार पेंदां. grand prise (मोठे बक्षीस) चे वाचन ग्रां प्रीझ (हा शब्द सर्वांच्या परिचयाचा आहे). est चा उच्चार ए. मात्र व्यंजनांच्या पुढे एखादा स्वर आला, तर त्यांचा संधी करून त्या व्यंजनाचा उच्चार करायचा. est चा उच्चार एरवी ए; पण est ill हे दोन शब्द एकत्र वाचताना एऽतील असे वाचायचे. (हे काहीसे संस्कृतसारखे आहे, नाही ? आणि est म्हणजे संस्कृत अस्ति बरं का!) bille (चेंडू) ह्या शब्दाचा उच्चार बीय. fille चे वाचन फीय (मुलगी) असे करायचे. पण ville गाव चा मात्र उच्चार व्हील असा करायचा.

**जर्मनः** जर्मन भाषाही उच्चाराच्या बाबतीत खूपशी नियमित आहे. म्हणजे उच्चारानुसारी आहे. असे असले, तरी तिच्यातही काही वेगळे उच्चार आहेतच. v आणि j ह्यांचे उच्चार अनुक्रमे फ आणि य असे करायचे. पण हा नियमच आहे. त्यामुळे त्यांना अनियमित म्हणणे कितपत बरोबर ठरेल, हे सांगता येत नाही. हे अगदी बंगालीच्या उलट आहे, नाही ? बंगालीत य चे वाचन ज आणि जर्मनमध्ये ज चे वाचन य! ab ह्या उपपदातील शेवटच्या b चे वाचन प करायचे. म्हणजे ab चे वाचन आप् करायचे. wenig (थोडे) हा शब्द वेनिक् असा वाचायचा. म्हणजे शेवटच्या मृदू (सघोष आणि महाप्राणविरहित) व्यंजनाचा उच्चार कठोर (आणि महाप्राणविरहित) व्यंजनाप्रमाणे करायचा.

फ्रेंच आणि जर्मन या भाषा उच्चाराच्या बाबतीत पुष्कळच नियमित आहेत. तरीही त्यात असे अनियमित उच्चार आढळतात. पण इंग्रजी तर उच्चाराच्या (किंवा स्पेलिंगच्या) बाबतीत अत्यंत अनियमित आहे, हे आपण सर्वचजण जाणतो. तिच्यातल्या उदाहरणे देण्याची मुळीच जरुरी नाही. कारण हा अनुभव इंग्रजी शिकताना आपण सर्वांनी घेतलेलाच असणार.

माझ्यासारख्याच सामान्य वाचकाला जाणवलेल्या या उदाहरणांमागे काही कारणे असतील. केवळ ती जाणून घेण्याच्या उद्देशाने हा 'प्रतिसाद' लिहिला आहे.

**मनोहर राईलकर, गजांजली, ४६, वाळवेकर इस्टेट, पुणे ४११००९.**

❑❑





अनुक्रमणिका

# एक उपयुक्त पुस्तक

**परीक्षण लेखक - सुमन बेलवलकर**

**परीक्षित पुस्तक- जर्मन शिकू या!** - ले. प्रा. अविनाश बिनीवाले, स्नेहल प्रकाशन, पुणे. पहिली आ., ऑक्टो., १९९४, मूल्य १७० रु.

एखाद्या भारतीयाने दुसरी एखादी भारतीय भाषा शिकणे आणि सर्वस्वी भिन्न देशाची परकी भाषा शिकणे यांत फरक आहे. भारतीय भाषांमध्ये सुद्धा एकाच वंशाची, जवळची भाषा म्हणजे मराठी माणसाने गुजराती किंवा हिंदी शिकणे आणि भिन्न वंशाची म्हणजे तमिळ, मल्याळमसारखी द्राविडी भाषा शिकणे यांचाही वेगळा विचार करावा लागतो. कधी दोन भाषांमधली तफावत पाहून शिकणाऱ्याला ती फारच अवघड वाटते. तर कधी सारखेपणा पाहून 'त्यात काय! आपल्यासारखंच आहे' अशा वृत्तीने दुसऱ्या भाषेबद्दल 'गृहीत धरण्याची' वृत्ती वाढते. आज तरी अन्य भारतीय भाषा शिस्तबद्ध रीतीने शिकण्याची निकड तुलनेने कमी दिसते. युरोपियन भाषा शिकण्यामागे मात्र नव्या सुवर्णसंधींचे आकर्षण जोरदार असते. भौतिक, तांत्रिक दृष्टीने प्रगत अशा देशाची वारी करायला मिळेल, ही आशा त्या भाषेकडे खेचून आणते. त्यात अर्थातच गैर काहीही नाही.

इंग्लिश ही युरोपियन भाषा मातृभाषा म्हणून सांगणारेही भारतात कमी नाहीत. दुसरी भाषा म्हणून ती अनेकांच्या अंगवळणी पडली आहे. फ्रेंच, जर्मन या भाषांचा विचार भारतीय माणूस करतो, तो त्यानंतर! पैकी जर्मनीत संस्कृतचे अध्ययन-अध्यापन मान्यता पावले आहे. अलीकडे सोन्थायमरांसारख्या संशोधकांनी मराठीत बरेच काम केले. त्यामुळे या देशाच्या परस्पर भाषाशिक्षणाला केवळ शैक्षणिक, व्यासंगिक असा पदर आहे. फ्रेंचप्रमाणे साहित्य, कला आणि जपानीप्रमाणे तंत्रज्ञान जाणून घेण्याची प्रेरणा जर्मनबद्दलही मुख्य मानता येईल. गटे-ग्यॉठ, ब्रेश्ट ही प्रलोभने आहेतच. त्याशिवाय संस्कृत किंवा मराठीचा अभ्यास करणाऱ्या जर्मन पंडितांचे सहधर्मी मित्रही भारतात अनेक आहेत.

'जर्मन शिकू या' हे प्रा. अविनाश बिनीवाले यांचे पुस्तक अशा शैक्षणिक हेतूच्या लोकांसाठी अधिक उपयुक्त आहे. शासकीय महाविद्यालयात पंचवीस वर्षांहून अधिक काळ जर्मन भाषेचे अध्यापन करणाऱ्या अनुभवी व्यक्तीने ते लिहिले आहे. 'जर्मन भाषा



अनुक्रमणिका

शिकण्यासाठी असलेला एकमेव ग्रंथ' (मराठीतून) असे त्याच्या मलपृष्ठावर जाहीर केले आहे. पुस्तकाची 'भूमिका' लिहिताना 'अंगविक्षेप करून झटपट भाषा शिकवण्याच्या अलीकडे बोकाळलेल्या पद्धती' चा सौम्य निषेध केला आहे. 'तौलनिक पद्धतीमुळे संस्कृत, मराठी, इंग्लिश, इत्यादी भाषांची वैशिष्ट्ये दाखवून जर्मनचा परिचय करून देणारा वैशिष्ट्यपूर्ण ग्रंथ' हे खास वैशिष्ट्य नमूद करून 'जर्मन शिकायचं नसलं, तरी भाषा आणि संस्कृती ह्या विषयांत रस असणाऱ्यांनी वाचलाच पाहिजे, असा ग्रंथ' अशी त्याची भलावणही केली आहे. लेखकाने जर्मन भाषेविषयी जागोजाग दिलेल्या स्फुट माहितीपेक्षा इतर भाषांशी केलेल्या तुलनेचा भाग एकूणच जास्त आहे. संस्कृतमधल्या अकर्मक क्रियापदांची माहिती देणारा श्लोक, जोडाक्षरांचा उच्चार सोपा करण्यासाठी हिंदी भाषकांनी केलेली सटेशन, इस्कूलसारखी रूपे, कानडी माणसाचे नामांच्या लिंगाची वाट लावणारे मराठी आणि बॉम्बे-आम्बेचा चुटका ही माहिती भाषा आणि संस्कृतीबद्दलच्या ज्ञानात भर घालते, हे खरे आहे. पण जर्मन भाषेच्या शिक्षणाची जागा या माहितीला खर्ची पडते; शिवाय शिकणाऱ्याचे लक्ष दुसरीकडे जाते, हा दोष पदरी येणारच! त्यापेक्षा जर्मन शिकणाऱ्या 'गरजू' ला केंद्रस्थानी ठेवले असते, तर जास्त बरे झाले असते!

भाषा शिकवण्याच्या पद्धती शिकणारी व्यक्ती, तिची विशिष्ट गरज; शिकवणारी व्यक्ती, भाषेचे स्वरूप, भाषिक परिसर, इ.नुसार वेगवेगळया असतात. इथे व्याकरण-संरचना ही पद्धत वापरली आहे. मधूनमधून तौलनिक रचनांचा खुलासा दिला आहे. काही संभाषणांचे तुकडेही दिले आहेत. पुस्तकात लेखकाची भूमिका अनौपचारिक, खेळीमेळीची आहे. 'शिका' ऐवजी 'शिकू या' या शीर्षकापासूनच ती व्यक्त होते. ती इतकी दोस्तान्याची आहे, की 'कठोर परिश्रमास पर्याय नाही' किंवा 'कन्नडिगें'चे मराठी' याची पुनरुक्तीही झाली आहे. कदाचित व्याकरणाचा लोक धसका घेतात, म्हणून होयबा, नायबा, कानामागून आली, संकट चतुर्थी, हुकुमशाही; केल्याने होत आहे, रे अशी चटपटीत नावे व्याकरणातल्या संज्ञांना दिली असावीत. लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाचा भाग म्हणून त्याचे स्वागत करायचे, की नाराजी दाखवायची, हे ज्याचे त्याने ठरवावे.

संरचना-व्याकरणाच्या पद्धतीने भाषा शिकवताना देखील सोपी रचना आधी आणि प्रथम शिकलेल्या रचनेच्या आधारे सहज समजेल, अशी पुढची रचना, असा श्रेणिबद्ध क्रम ठेवावा लागतो. उदा., मराठीत 'हे काय आहे' हा प्रश्न आणि त्याचे एकवचनी उत्तर ही नामांसाठी रचना आधी शिकवणे योग्य. आज्ञार्थात धातूचे मूळ रूप आहे. तसेच जा, ये (ए.व.) असते, म्हणून प्रथम आज्ञार्थ शिकवून मग जातो, जातो आहे, जाईल, इ. शिकणे सोयीचे जाते. इथे बराचसा क्रम शब्दांच्या जातींप्रमाणे म्हणजे नाम, सर्वनाम, क्रियापदे, काळ, विशेषणे, क्रियाविशेषणे, आज्ञार्थ, केवलप्रयोगी अव्यये, समास असा आहे. या मांडणीत वरच्याप्रमाणे सूत्र, श्रेणी सापडणे

कठीण आहे.

प्रत्येक रचनेसाठी तयार केलेल्या पाठात व्याकरणाची माहिती; कर्ता कशाला म्हणायचे - कर्म कसे ओळखायचे, यांचाच खुलासा जास्त आहे. तुलनेने दिलेली उदाहरणे सुटीसुटी, तुकड्यांची आहेत. प्रसंगाला धरून पाठ नसल्यामुळे ह्या तुटक वाक्यांचा उपयोग किती होईल, याची शंका वाटते. परभाषकाची गरज एखाद्या प्रसंगी 'कसे बोलायचे', या स्वरूपाची जास्त असते. पाठरचनेच्या इथल्या धोरणामुळे 'भाषेचा' पाठ न घेता तो 'भाषेविषयी' पाठ झाला आहे. उदा.,- मी, तू, इ. हा सर्वनामांवरचा पाठ. ६ पानांच्या या पाठात द्वितीय पुरुषवाचक सर्वनामे वापरलेली वाक्ये फक्त तीन आहेत. भाषा शिकणाऱ्यापुढे 'भाषा' च जास्तीत जास्त हवी; भाषेविषयी स्पष्टीकरण वाचून केवळ त्याच्या ज्ञानात भर पडेल, 'वाणी' त नाही. शिवाय इथे मराठी व्याकरणच शिकवले जाते आहे, असे वाटते. सामान्यांसाठी अगम्य असे, पण व्यासंगी लोकांसाठी दिलेले तपशील सुद्धा याच भूमिकेतून येतात. उदा.; श चा उच्चार पश्चात् दंतमूलक अघोष, संघर्षी – श चा उच्चार कंठीतालव्य अघोष संघर्षी ही भाषावैज्ञानिक शब्दावली. व्याकरणाचा इथे दिलेला खुलासा पाहून लेखकाचे अध्यापनविषयावरचे प्रभुत्व, दीर्घ अनुभव यांची जाणीव होते. एखादी गोष्ट रंजकपणे पण नेमकी स्पष्ट करून सांगण्याची हातोटी लेखकाजवळ आहे. व्याकरणात काही ठिकाणी मतभेद होऊ शकतो. 'माझा, आमचा...मराठीत व्यक्तिवाचक सर्वनामांची षष्ठी विभक्तीची रूपे.... जर्मनमध्ये ही सर्वनामे म्हणजे या व्यक्तिवाचक सर्वनामांची षष्ठी विभक्तीपासून तयार झालेली विशेषणे आहेत.' (पृ.४१) या विधानातल्याप्रमाणे मराठीत रूपे आणि जर्मनमध्ये विशेषणे असे नाही. दोन्ही भाषांमध्ये ती सर्वनामात्मक स्वामित्वदर्शक विशेषणेच आहेत. पी हे क्रियापद्र सकर्मक असले, तरी मराठीत अनियमित आहे. त्याचा भूतकाळ 'त्याने दूध प्यायले' असा नसून 'तो दूध प्यायला' (पृ.८२) असा हवा.

व्याकरणाचे पाठ झाल्यावर गटवार दिलेला शब्दसंग्रह व्यावहारिक दृष्टीने बनवलेला आणि अतिशय उपयुक्त आहे. सहज हाताशी किंवा नजरेपुढे राहावा, असा हा छोटा शब्दकोशच आहे.

पुस्तकाच्या रंजकतेला आणि उपयुक्ततेला गालबोट लागले आहे. ते छपाईच्या चुकांचे. कोल्हापूरहून ऐवजी कोल्हापरूमधून; बाळा मी आज चित्रपटाला जाऊ का– तुम्हांला काय करायला खुप आवडतं? अशी कृत्रिम वाक्ये किंवा 'तीच व्यक्ती मग पतीची असेल.... वेगवेगळी असतील' पृ. ३२ अशी एखादी चुकीची वाक्यरचना अशा लेखकाच्या नजरचुकीने राहिलेल्या काही चुका आहेत. पण छपाईच्या चुकांचे प्रमाण भयानक आहे. आकर्षक (अकर्मक), नंद्रु (नपु), अधिल (आधि, अनिल), अत्यन्त्र (अत्यंत), धंक्यापासून (धोक्यापासून), कारयाना (कारखाना), सदरिजीनं (सरदारजीनं), संख्या (संध्या) अशा ढोबळ चुका अनेक आहेत. झें, चें, णें, कसें, कीं, रूपें हें अशी अनुस्वारांची अनाठायी उधळण आहे. इंग्लिश शब्दांच्या देवनागरी लेखनातही

इक्ल्युझिव, इंग्लिश-इंग्लिस-इंग्लिग, कन्जंशन असा फटका बसला आहे. १७० रुपये इतकी किंमत असलेल्या या पुस्तकात इतक्या छपाईच्या चुका असणे क्षम्य नाही. वरच्या दर्जाच्या मराठी पुस्तकांमध्येही छपाईच्या चुकांकडे दुर्लक्ष केले जाते. १८०६ पासून मराठी पुस्तकांवर छापण्याचा संस्कार होतो आहे. आता संगणकाची मदत मिळाल्यावर वास्तविक चुका अजिबात राहू नयेत. सर्वच मराठी प्रकाशकांनी इकडे गंभीरपणे लक्ष पुरवणे आवश्यक आहे.

जर्मन वाक्यरचनांचे शास्त्रशुद्ध ज्ञान घेण्याच्या दृष्टीने हे पुस्तक उपयुक्त आहे. १९१५-१६ या वर्षी नाना वाड्यात संपूर्ण भारतात प्रथमच जर्मन शिकवण्याची सोय झाली होती, अशी नोंद इथे आहे. राष्ट्रगीत लिहिणाऱ्या कवीला पेन्शनही न देता काढून टाकण्यात आले होते. या आणि अशा प्रकारच्या पूरक माहितीमुळे या पुस्तकाची वाचनीयता निश्चित वाढली आहे.

**पश्चिम विभागीय भाषा केंद्र, डेक्कन कॉलेज, पुणे ४११००६.**

## सांस्कृतिक गरजा लक्षात घेऊन लिहिलेले भाषाध्यापन पुस्तक

**परिक्षण लेखक : सुमन बेलवलकर**

**'बंगाली शिका'** - ले. डॉ. अपर्णा झा, ॲड. हेमनारायण झा., प्रकाशक : नितीन प्रकाशन, पुणे ३०, मूल्य ४० रु, प्रथमावृत्ती २६ जानेवारी, १९९४

परभाषेचा अभ्यास करण्याच्या हेतूने ती शिकणे आणि एखाद्या गरजेपोटी तिचे कामचलाऊ ज्ञान मिळवणे असे दोन मुख्य प्रकार दुसरी भाषा शिकताना संभवतात. भाषावैज्ञानिक किंवा परभाषेतल्या साहित्याचा आस्वाद मूळ रूपात घेऊ इच्छिणारे अभ्यासक साधारणपणे पहिल्या वर्गात मोडतात. स्थानिक भाषा शिकणारे परप्रांतीय व्यावसायिक, जपानी भाषा शिकणारा इंजिनीअर किंवा चरकसंहितेवर संगणकासाठी काम करणारा संस्कृत शिकलेला प्रोग्रॅमर यांचे हेतू बरेचसे आखीव असतात. दुसऱ्या महायुद्धाच्या वेळी जगाच्या कोनाकोपऱ्यांत जेव्हा सैन्य उतरवावे लागले, तेव्हा भाषा-शिक्षणाची निकड वाढून परभाषा शिकवण्याला दोस्त राष्ट्रांनी मोठीच चालना दिली होती. भाषा शिकू इच्छिणाऱ्यांमध्ये एक गट मुशाफिरांचाही असतो. गाड्यांच्या वेळापत्रकाइतकेच त्यांना त्या त्या प्रांतातल्या भाषेचे एखादे छोटेखानी पुस्तक खिशात असणे अगत्याचे वाटते. भारतात साधारण १२ कोसांवर बोली बदलते, तर बारा मोठ्या

गावांनंतर प्रांत बदलून भाषा बदलते, असे म्हटले, तरी चालेल. अशांच्या सोयीसाठी 'बंगाली शिका' हे या मालिकेतील पुस्तक नितिन प्रकाशनने प्रकाशित केले आहे. मराठी आणि बंगाली या पुस्तकातल्या भाषा अनुक्रमे डॉ. अपर्णा झा आणि ॲड. हेमनारायण झा यांच्या मातृभाषा आहेत. डॉ.अपर्णा झा भाषाविज्ञान विषयात Ph. D. असून त्यांना मराठी आणि बंगाली परभाषा म्हणून शिकवण्याचा अनुभव आहे.

हे पुस्तक केवळ प्रवाशांचे मार्गदर्शक चोपडे नाही. 'प.बंगाल राज्याचा परिचय व मराठीतून बंगाली शिकण्यास उपयुक्त पुस्तक' असे शीर्षकाखाली स्पष्ट नमूद केले आहे. पुस्तकाचा आकार आणि किंमत (ठळक अक्षरांत रुपये चाळीस फक्त) हा हेतू स्पष्ट करतात. (पुस्तकाच्या तांत्रिक नोंदीमध्ये श्री. विलास गिते यांचे विशेष आभार कशासाठी मानले गेले, ते समजत नाही.) 'भद्र' लोकांच्या सांस्कृतिक गरजा लक्षात घेऊन हे पुस्तक लिहिले गेले आहे. त्यादृष्टीने 'प्रास्ताविक' आणि 'बंगालमध्ये कसे वागावे' ही पहिली दोन प्रकरणे महत्त्वाची आहेत. बंगालमध्ये काय पाहाल? अशी जंत्री इथे नाही. बंगालचा भूगोल, परंपरा, वेशभूषा, सणवार, साहित्य, रंगभूमी, इत्यादींची थोडक्यात पण नेमकी माहिती इथे आहे. विशेषतः, साहित्य आणि रंगभूमी यांची अद्ययावत माहिती त्या क्षेत्राबाहेरच्यांना सहजासहजी मिळत नाही. पण या आशयाला योग्य असा त्याचा आविष्कार झालेला दिसत नाही. पृ.५, ६ या पहिल्या दोन पानांवरच कृषिप्रधान, प्रातांत, अनेक नावासारखे, मजुरान, ब्रिटीश, शहराच्या जागी व सुतानाती या शब्दांमध्ये स्वल्पविराम, असुन, शहरांच, कॉलज अशा छपाईच्या चुका असून पुढे त्या वाढत गेल्या आहेत. तांदुळाची, तांदूळांची आणि तांदूळाचे या तीन सामान्य रूपांमध्ये खऱ्या रूपाचा पत्ताच नाही. अशा चुका एक वेळ प्रकाशकाच्या माथी मारता येतात. पण शब्दयोजना, वाक्यरचना यांची जबाबदारी लेखकाचीच असते. संग्रहालयात असंख्य चित्रं, असंख्य वस्तू कशा असतील? शहर काबू केल्यावर, स्त्री-पुरुष-मूल- मुली, उपास करावा, अशी प्रथा, सहकार्यकारी, कलातून विकसित पावून, दखल न घेतली, मानविक दृष्टिकोनातून अशा शब्दयोजनेच्या चुका टाळणे आवश्यक होते. सजग आर्टिस्ट, सिनेमात ॲक्टिंग, रेकॉर्डब्रेक किंवा ब्रेकथ्रू नाटक, इ. ठिकाणी इंग्लिश शब्द अपरिहार्य वाटत नाहीत. शुद्ध किंवा तत्सम = संस्कृत आणि तद्‌भव = विकृत ह्या समानार्थी व्याख्या भाषाविज्ञान मान्य करणार नाही.

वाक्यरचनेबद्दलही असाच निष्काळजीपणा दिसतो. उदा., एशियाटिक सोसायटी जिला नुकतीच शंभर वर्षे पूर्ण झाली; एक लोखंडी बांगडी जिला मध्ये छेद असतो, वंदेमातरम्‌ ह्या गीताने जे आपलं राष्ट्रगीत आहे, ह्या इंग्रजी रचना मराठीत चालत नाहीत. अनेक मिठाईचे प्रकारही त्यांच्या खाण्यातील पदार्थांचे वैशिष्ट्य आहे, नाटकं... (नावे) ही गाजली, या जमान्यातून आधुनिक कालापर्यंत, पंडित ज्यांचा परदेशांतही गौरव झाला, अशा सदोष वाक्यरचना पाहून लेखकांच्या मराठी भाषेविषयी मात्र शंका येते. बंकिमचंद्रांविषयी वाक्य कोणत्या कर्त्याने सुरू झाले आणि कोणत्या कर्त्यामागे

गेले, हेही याचेच उदाहरण. शैलीच्या दृष्टीने 'ही नावे अविस्मरणीय होत' नंतर पुढच्याच वाक्यात 'यांना कोणीही विसरणार नाही', असे लिहायला नको होते. 'भारताचं नाव नोबेल पुरस्कारानं विश्वविख्यात करणारे हे... देशभक्त होते' या वाक्यात अर्थ नीट पोचत नाही. 'सर्वांत यथातथ्य तत्कालीन सामाजिक जीवनाचं दर्शन घडवणारं नाटक' या वर्णनात 'यथातथ्य' ला त्याची योग्य जागा दाखवायला हवी. पुस्तक बाजारात आणताना ते केवळ आशयदृष्ट्या अभ्यासपूर्ण असून भागत नाही. भाषा, शैली, छपाई निर्दोष असणे हा व्यावसायिक कौशल्याचा आवश्यक भाग आहे.

या पुस्तकात 'बंगालमध्ये कसे वागावे ?' ही थोडक्यात दिलेली माहिती उपयुक्त आणि रंजकही आहे. विशेषत:, मराठी माणसाला 'उजव्या हातानेच पाणी प्या' किंवा 'शुक शुक करू नये' या सूचना अंगी बाणवणे जरा जडच जाईल. सत्कार म्हणजे अंत्यसंस्कार हे तर विसरून चालणार नाही. इथेही ७ व्या सूचनेत ५२ शब्दांचे एक भले लांबलचक वाक्य योग्य जागी तोडून लिहायला हवे होते.

पुढच्या भाषाशिक्षणाच्या प्रकरणांमध्ये प्रथम वर्णमाला दिली आहे. ती परंपरेप्रमाणे आहे. त्यामुळे वर्णांचा क्रम समजायला सोपी आहे. य - ज (पृ.२३) चे उदाहरण मात्र हवे होते. सर्वांत उपयुक्त आहे, तो 'बंगाली अक्षरे अशी लिहा' हा तक्ता. योग्य छपाई, बाणांनी दाखवलेले वळण आणि आकृती (पृ.२४.२६) यामुळे ही अक्षरे गिरवून शिकणे सहज शक्य आहे. जोडाक्षरे म य र ल व इतक्याच अक्षरांविषयी दिली आहेत. मराठी जोडाक्षरांचे आकार उभ्या रेघेप्रमाणे असतात. एक र सोडल्यास त्यांचे गट पाडून नियम देता येतात. तसे नियमांना धरून विवेचन इथे अपेक्षित आहे. (इथेही स्रोत - स्तोत्र बनला आहे) २९ पानावर शब्दाच्या शेवटच्या अ चा ओ होत नाही, असा नियम आहे; पण २८ पानावरची उदाहरणे भक्तो, बद्धो अशी कशी ? अखेरचा 'अ' अकारान्त, की व्यंजनान्त, याचाही खुलासा नाही.

भाषेत प्रवेश करताना उपयुक्त शब्दसंग्रह दिला आहे. काल, अवयव, चवी, आकडे देताना व्यावहारिक गरज लक्षात घेतली आहे, हे स्पष्ट होते. पण षड्रिपु, राशी, तिथि गाळून नेहमीच्या गरजेच्या काही वस्तूंचा समावेश केला असता, तर बरे झाले असते.

९,१०,११,१२,१३ या प्रकरणांमधे व्याकरण दिले आहे. लिंगविचारात मराठीत निर्जीव वस्तूंची नामे तीन लिंगांत असतात (फळा, टेबल, खुर्ची) ;वस्तू आणि नामाचे लिंग यांचा काहीही कार्यकारणसंबंध नसतो (संस्कृतप्रमाणे) तसे बंगालीत नाही; हे कुठेही स्पष्ट केलेले नाही. द्रविडी अथवा असमिया, ओरिया, बंगाली या भाषांमधे आणि मराठीत हा मुख्य फरक आहे. परस्परांना त्याची जाणीव करून दिल्याशिवाय पुढे जाता येत नाही. तसेच पुत्र-कन्या, वर-वधू ही पुंलिंगी-स्त्रीलिंगी रूपे व्याकरणिक नाहीत.

एकवचन-अनेकवचनाचा खुलासा दिल्यानंतर त्याखाली सांगितलेला सराव केवळ वचनकेंद्रित नाही. विभक्तिप्रत्यय समजावून देताना राम-भरत, राजा यांची वाक्ये

सोडल्यास इतर उदाहरणे चांगली, रोजच्या भाषेतली आहेत. 'ओ' (सुद्धा, ही याअर्थी) हे उभयान्वयी अव्यय नाही- शब्दयोगी आहे. असमापिका क्रिया (participle) या धातुरूपांमधे 'करून' प्रमाणे करताना, करायला, करायचा, इ. पण यायला हवीत. साधा भूतकाळ आणि सामान्य भविष्यकाळ यामधे 'साधा' आणि 'सामान्य' या संज्ञांमागे कोणता फरक अपेक्षित आहे, ते स्पष्ट होत नाही. मराठीतला 'करणार आहे' हा भविष्यकाळ बंगालीत आहे का ? इथला 'मी करीत आहे' हा लिखित, औपचारिक चालू वर्तमानकाळ आता मागे पडून 'मी करतोय्', 'मी करतेय्' यांनी त्याची जागा घेतली आहे. बंगाली कॉरो आणि बोशुन मधला आज्ञार्थाचा फरक इथे स्पष्ट केलेला नाही.

हे परंपरागत व्याकरण थोडक्यात असले, तरी भाषाशिक्षणाच्या पुस्तकात ते असे देण्याला आक्षेप घेता येईल. भाषेचा प्रत्यक्ष उपयोग आणि तदानुषंगिक व्याकरणाचा खुलासा असे भाषा शिकवण्यासाठी योग्य तंत्र मानले गेले आहे. इथली उदाहरणे बोलभाषेतली असल्यामुळे केवळ नियम मनात राहत नाहीत. 'जदि' चे उदाहरण तर रवींद्रांच्या प्रसिद्ध काव्यपंक्तीत वाचून मन प्रसन्न होऊन जाते.

साधु भाषा आणि चलित भाषा हा प्रत्येक भाषेत कमी अधिक ठळक असणारा भेद इथे योग्य उदाहरणांनी दाखवून दिला आहे. पुस्तकातून भाषा शिकल्यामुळे पुस्तकीपणाचा, छापील भाषेचा जो दोष राहतो, तो यामुळे दूर होईल.

प्रत्यक्ष बंगालीतले पाठ पृ. ६६ ते पृ. ११७ पर्यंत आहेत. बंगालला भेट देणाऱ्यांच्या बाबतीत शक्य असे पत्र धरून १६ प्रसंग निवडून त्यांची आटोपशीर अशी संभाषणे दिली आहेत. मराठी- बंगालीत बंगाली- देवनागरीत बंगाली अशी तिहेरी छपाई वाचकाला फार सोयीची आहे. इथे छपाई बरीच दोषरहित आहे. (असे छापूनही किंमत कमी ठेवल्याबद्दल प्रकाशकांचे अभिनंदन)

केवळ प्रसंगानुसार संभाषण आणि शब्दार्थ देऊनही हे पुस्तक बऱ्याच गोष्टी साधते. सर्वत्र बंगाली भाषा, जीवन, समाजाचे प्रतिबिंब या संभाषणांत दिसते. त्यांची बंगाली सहज समजते. विशेष म्हणजे, 'तिची सांगोपांग पूजा करतात' (पृ. १०९) हे उदाहरण सोडले, तर इथली मराठीही स्वाभाविक वाटते. ओढून ताणून किंवा शब्दाला शब्द अशी भाषांतरे इथे आढळत नाहीत.

विषयांच्या निवडीबद्दल मात्र एक सुचवावे, असे वाटते. १४, १५, १६,१७,१८ इतकी २० मधली ५ संभाषणे दुर्गापूजा, सरस्वतीपूजा यांच्याविषयी आहेत. दुर्गापूजेचे अनन्यसाधारण महत्त्व मान्य करूनही बंगाली समाजाचे इतरही काही पैलू दुर्लक्षित राहिले, असे म्हणावे लागते. 'नंदन' मधला चित्रपट, रवींद्रसदन मधला नाट्यप्रयोग, पुस्तकांची जत्रा, भुयारी रेल्वे, शांतिनिकेतनला भेट किंवा कलकत्त्यात सतत होणारे 'बंद' हेही महत्त्वाचे आहे. मराठी माणूस शांतिनिकेतनला भेट दिल्याशिवाय कसा राहील ? शिवाय बंगाली माणूस मराठी माणसाइतका नसला, तरी चांगलाच संतापी,

भांडखोर असतो, पुस्तकात एखादे भांडण किंवा अधूनमधून विनोद असते, तर मजा आली असती. केव्हाही, कुठेही होणारे असंतोषाचे दर्शन ही कलकत्त्याच्या जिवंतपणाची खूण आहे. अश्रुधूर, बंद चा फटका चार-दोन दिवसांसाठी गेलेल्याला पण बसतो. अर्थात 'हवे होते' ही यादी ऐच्छिक आहे. पुस्तकाच्या मर्यादेचे भान ठेवावे लागते. तरीही असे काही विषय असते, तर पुस्तक 'धार्मिक' वाटते, तसे वाटले नसते.

अनौपचारिक पत्रे, म्हणी आणि 'बंगाली कुठे ऐकाल ? कुठे वाचाल ?' ही पुरवणी जोडून लेखकांनी पुस्तकाला अधिकाधिक परिपूर्णता आणली आहे.

मराठ्यांचे बंगाली प्रेम १९ व्या शतकापासून व्यक्त झाले आहे. वरेरकर - गुर्जरांनी केलेले अनुवाद, रवींद्रांची 'शुन नलिनी' मधली नलिनी तर्खड किंवा विवेकानंद कोणालाही विवेकानंद म्हणून ठाऊक नव्हते, तेव्हा टिळकांनी महाबळेश्वरहून स्वतःबरोबर आणून त्यांचा केलेला आदरसत्कार (मराठी) असे अनेक दुवे बंगाल आणि महाराष्ट्राला जोडणारे आहेत. न्या. रानडे कलकत्त्याला गेले असता केवळ अंकलिपी आणि वर्तमानपत्रांच्या आधारे एका आठवड्यात बंगाली शिकले. आपल्या न्हाव्याशी हजामतीच्या वेळी बंगालीत बोलायला त्यांनी सुरुवात केली, तेव्हा ते चकित झाला, असे सांगतात. प्रत्येकजण त्यांच्या सारखा 'सर्वज्ञः स हि माधवः' नसतो. त्यांच्यासाठी हे पुस्तक अतिशय उपयुक्त ठरेल.

**पश्चिम विभागीय भाषा केन्द्र, डेक्कन महाविद्यालय, पुणे ४११ ००६.**

□□





अनुक्रमणिका

# महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

**नवलेखक अनुदान योजना**

कठीण आर्थिक परिस्थितीतील नवलेखकांना उत्तेजन मिळावे म्हणून त्यांच्या काव्यसंग्रह, कथासंग्रह, कादंबरी, नाटक/एकांकिका (संग्रह), ललितगद्य, वैचारिक वाङमय, चरित्र, आत्मचरित्र/आठवणी व बालवाङमय या वाङ्मयप्रकारातील पहिल्या पुस्तकाच्या प्रकाशनार्थ अनुदान देण्याची "नवलेखक अनुदान योजना" महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या वतीने कार्यान्वित करण्यात येत आहे. या योजनेखाली सन १९९६-९७ या चालू आथिक वर्षासाठी नवलेखकांकडून साहित्य मागविण्यात येत आहे. ज्यांचे कोणत्याही वाङमय प्रकारातील स्वलिखित/संपादित/अनुवादित एकही पुस्तक प्रकाशित झालेले नाही अशांनाच या योजनेचा लाभ घेता येईल. या योजनेत साहित्य पाठविताना पुढील गोष्टी लक्षात घ्याव्यात :

१) या योजनेखाली वर उल्लेख केल्याप्रमाणे लेखकाच्या फक्त पहिल्या पुस्तकाच्याच प्रकाशनार्थ अनुदान देण्यात येईल.

२) काव्यसंग्रह, नाटक/एकांकिकासंग्रह, कादंबरी, कथासंग्रह, ललितगद्य, वैचारिक वाङमय, चरित्र, आत्मचरित्र/आठवणी व बालकुमार साहित्य हे या कोणत्याही प्रकारातील वाङमय असावे आणि ते १ ऑक्टोबर, १९९६ पर्यंत मंडळाकडे पाठवावे.

३) मंडळाकडे अनुदानासाठी पाठवावयाचे साहित्य/हस्तलिखित स्वच्छ, सुवाच्य व कागदाच्या एकाच बाजूस लिहिलेले असावे. साहित्य टंकलिखित, झेरॉक्स असल्यास कागदाच्या एकाच बाजूस टंकलिखित/झेरॉक्स केलेले असावे. छापील कात्रणे चालणार नाहीत. पाठवावयाच्या साहित्यात शुद्धलेखनाच्या चुका नसाव्यात. प्रस्तावना, अनुक्रमणिका, व एकूण पृष्ठसंख्या इत्यादी गोष्टींची पूर्तता करून साहित्य व्यवस्थित बांधून पाठवावे. तसेच हस्तलिखित/टंकलिखित प्रतीवर पुस्तकाचे नाव, वाङ्मयप्रकार व लेखकाचा पत्ता लिहिलेला नसावा. कारण तज्ज्ञ-परीक्षकांकडे हस्तलिखित अभिप्रायासाठी पाठवताना लेखकाचे नाव, पत्ता वगैरेबद्दल मंडळ गोपनीयता राखते.

४) मंडळाकडे आलेली हस्तलिखित तज्ज्ञ परीक्षकांकडे पाठविली जातात.

त्यांचा अभिप्राय अनुकूल असला तरच अनुदान देण्याबाबत मंडळ निर्णय घेते. हा निर्णय साधारणतः एप्रिल अखेरपर्यंत कळविला जातो.

५) अनुदानास पात्र ठरलेल्या साहित्यात तज्ज्ञांच्या अभिप्रायानुसार काही फेरफार आवश्यक वाटल्यास ते करून स्वच्छ मुद्रणप्रत तयार करून देण्याची जबाबदारी संबंधित लेखकाची आहे. ही सुधारित प्रत मंडळाकडे आल्यानंतरच अनुदानासंबंधीचा अंतिम निर्णय घेण्यात येईल.

६) अर्जासोबत कसलेही शुल्क (फी) अथवा उत्तरासाठी टपाल हंशील पाठविण्याची जरूरी नाही. हस्तलिखिताची फक्त एकप्रत नोंदणी डाकेने मंडळाकडे पाठवावी. हस्तलिखित टपालात गहाळ झाल्यास त्याची जबाबदारी मंडळ स्वीकारणार नाही. हस्तलिखिताची पोच देण्यात येईलण आपल्या लेखनाची एक प्रत सुरक्षिततेच्या दृष्टीने लेखकाने आपल्याजवळ ठेवणे आवश्यक आहे. कोणतेही हस्तलिखित परत पाठविले जाणार नाही.

७) स्वीकृत साहित्याच्य संपादनाचे व पहिल्या आवृत्तीच्या प्रकाशनाचे सर्व अधिकार मंडळाकडे राहतील.

८) साहित्य मंडळाच्या कार्यालयाकडे दिनांक १ ऑक्टोबर, १९९६ पर्यंत पाठवावे.

अनुदान नमुना अर्ज व माहितीपत्रक मागविणे तसेच अधिक माहितीसाठी पत्रव्यवहाराचा पत्ता :

श्री. चंद्रकांत वडे,<br>
सचिव,<br>
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ<br>
एन्सा हटमेंट "डी" ब्लॉक, आझाद मैदान,<br>
महापालिका मार्ग, मुंबई - ४०० ००१.

□□





अनुक्रमणिका

## पैसे भरण्याबद्दल सूचना :

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनिऑर्डरकूपनवर किंवा चेकसोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम आणि ती कशा पोटी पाठवली, ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता मिळाला, याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठविली जाईल.

## पत्रिकेची वर्गणी :

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे करण्यात येते

- चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद वर्गणी धरून) वर्षाला ४० रु.
- चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यासाठी वर्षाला ६० रु.
- सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो, की मागील वर्षापैकी असो) १५ रु.
- परदेशातील व्यक्तींसाठी वर्षाला १० डॉलर.
- परदेशातील संस्थांसाठी वर्षाला १५ डॉलर.
- सुटा अंक परदेशी पाठवायचा झाल्यास त्याची किंमत ४ डॉलर इतकी पडेल.

## परिषदेची वर्गणी :

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यापैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला. तर इतर सभासदांनी केवळ २० रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ : एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ४० रु. + २० रु. असे एकूण ६० रु. भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी ४०० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी १०० डॉलर), हितचिंतकासाठी १००० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी २५० डॉलर) किंवा जास्त, आश्रयदात्यांसाठी ५००० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी ५०० डॉलर) किंवा जास्त.

(आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही.)

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

## जाहिरातीसाठी दर :

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु., आवरण पृष्ठ चार १००० रु., आवरण पृष्ठ दोन / तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.

नोंदणी क्रमांक : 0-40048/83

## ● आपण मराठी-अभ्यास-परिषदेसाठी काय करणार?

➢ सभासद नसाल, तर प्रथम स्वतः सभासद व्हा.

➢ सभासद असाल, तर देणगीदार / आश्रयदाते सभासद आणि साधारण / आजीव सभासद मिळवून द्या.

➢ परिषदेसाठी काही नियमित वेळ देऊ शकत असाल तर चिटणिसांशी संपर्क साधा.

➢ परिषदेचे सर्व कार्यकर्ते आपले नित्याचे काम सांभाळून परिषदेची कामे करीत असल्यामुळे एकाच्या जागी चार कार्यकर्ते लागतात.

➢ परिषदेने प्रकाशित केलेल्या पुस्तकांच्या विक्रीसाठी सहाय्य करा.

➢ परिषदेचे काम वाढविण्यासाठी नवनव्या कल्पना सुचवा.

## ● आपण पत्रिकेसाठी काय करू शकता?

➢ लेखन पाठवा.

➢ परभाषांतून अनुवाद करा.

➢ ग्रंथपरीक्षणे लिहा.

➢ 'पुनर्भेट' किंवा 'वाघिणीचे दूध' या सदरास योग्य अशा मराठी किंवा अन्य भाषेतील मजकुराबद्दल सूचना पाठवा.

➢ भाषेसंबंधी वार्ता, भाषादोषांची उदाहरणे, चांगल्या भाषेची उदाहरणे, इत्यादींशी संबंधित वृत्तपत्रीय किंवा इतर कात्रणे पाठवा.

➢ पत्रिकेत भाषा व्यवहाराशी संबंधित हास्यचित्रे द्यायची कल्पना कशी वाटते?

➢ जाहिरात मिळवून द्या.

➢ संस्था-वर्गणीदार मिळवून द्या.

**● संपर्क ●**

मराठी अभ्यास परिषद

१, शीतल अपार्टमेंट,

४६/४,एरंडवणे, पुणे - ४११ ००४.

(दूरध्वनी : ३३ ३८ ६९)








